**कृशदुर्बल वृद्धानां पुष्टिवर्णबलार्थिनाम् ।**
**योनिदोषक्षतस्रावहतानां चापि योषिताम् ॥ ७२ ॥**
**गर्भार्थिनीनां गर्भश्च स्रवेद्यासां म्रियेत वा ।**
**धन्या बल्या हितास्ताभ्यः शुक्रशोणितवर्धनाः ॥ ७३ ॥**

**सर्पिर्मोदक**–गाईचें दूध ८ शेर, तूप १ शेर, उंसाचा रस चार शेर, भुइकोहळ्याचा अंगरस एक शेर व तित्तिरपक्ष्याचा मांसरस एक शेर, हीं सर्व एकत्र मिळवून अग्नीवर शिजत ठेवावीं. हें मिश्रण बरेंच उकळून तयार होण्याच्या बेतांत आलें ह्मणजे त्यांत मोहाचीं फुलें १६ तोळे, चारोळ्या १६ तोळे, वंशलोचन ८ तोळे, खारका वीस, बेहडे वीस, पिंपळी चार तोळे, खडीसाखर १२० तोळे, ज्येष्ठमध एक तोळा, आणि जीवनीय गणांतील औषधें दोन दोन तोळे हीं उंसाच्या रसांत वाटून घालावीं. हें सिद्ध होऊन थंड झालें ह्मणजे त्यांत १६ तोळे मध आणि चार चार तोळे काळीं मिरें व काळें जिरें यांचें चूर्ण मिळवून लाडू बनवावे. हे मोदक वात, रक्तपित्त, क्षत, खोकला, धातुक्षय, राजयक्ष्मा, वीर्यक्षय, छातींत रक्त गोठणें, कृश, दुर्बळ, वृद्ध; पुष्टि, कांति, व शक्ति इच्छिणाऱ्या मनुष्यांस, योनिरोग, योनिक्षत, योनिस्रावानें पीडिलेल्या, वांझ, ज्यांचा गर्भस्राव होतो किंवा मुलें होऊन मरतात अशा स्त्रियांस हितकर, शक्ति देणारे, धन्य, आणि वीर्य व रक्त वाढविणारे आहेत.

**बस्तिदेशे विकुर्वाणे स्त्रीप्रसक्तस्य मारुते ।**
**वातघ्नान्बृंहणान्वृष्यान्योगांस्तस्य प्रयोजयेत् ॥ ७४ ॥**
**शर्करापिप्पलीचूर्णैः सर्पिषा माक्षिकेण वा ।**
**संयुक्तं वा शृतं क्षीरं पिबेत्कासज्वरापहम् ॥ ७५ ॥**
**फलाम्लं सर्पिषा भृष्टं विदारीक्षुरसे भृतम् ।**
**स्त्रीषु क्षीणः पिबेद्यूषं जीवनं बृंहणं परम् ॥ ७६ ॥**
**सक्तूनां वस्त्रपूतानां मन्थं क्षौद्रघृतान्वितम् ।**
**यथाप्रसारभ्यो दीप्ताग्निः क्षतक्षीणः पिबेन्नरः ॥ ७७ ॥**

जीवनीयोपसिद्धं वा घृतभृष्टं तु जांगलम् ।
रसं प्रयोजयेत्क्षीणो व्यंजनार्थं सशर्करम् ॥ ७८ ॥
गोमहिषाश्वनागाजैः क्षीरैर्मांसरसैस्तथा ।
यथाग्नि भोजयेद्यूषैः फलाम्लैर्घृतसंस्कृतैः ॥ ७९ ॥
दीप्तेऽग्नौ विधिरेषः स्यान्मन्दे दीपनपाचनः ।
यक्ष्मिणां विहितो ग्राही भिन्ने शकृति चेष्यते ॥ ८० ॥

अत्यंत कामासक्त मनुष्याचा वायु बस्ति प्रदेशांत विकृत झाला असतां त्यास वातनाशक, पौष्टिक व वीर्यवर्धक औषधें द्यावीं. खडीसाखर व पिंपळीचें चूर्ण तुपांतून किंवा मधांतून घ्यावें. अथवा पिंपळी व खडीसाखर घालून आटविलेलें दूध घ्यावें ह्मणजे खोकला व ताप बरे होतात. भुईकोहळ्याच्या व उंसाच्या रसांत आमसोलें टाकून त्यांचें कढण करावें व त्यास तुपाची फोडणी देऊन तें अतिशय स्त्रीसंगानें क्षीण झालेल्या मनुष्यानें घ्यावें. हें उत्तम आयुरक्षक व पौष्टिक आहे. ज्या क्षतक्षीण मनुष्याचा अग्नि प्रदीप्त असेल व ज्यास जवांचें अन्न मानवत असेल त्यानें वस्त्रगाळ सातूच्या पिठाचें मंथ करून मध--तूप मिळवून घ्यावें. क्षीण झालेल्या मनुष्यानें जीवनीय गणांतील औषधें घालून जांगल जनावरांच्या मांसाचा शोरवा तयार करून त्यास तुपाची फोडणी देऊन त्यांत थोडी साखर घालून त्याबरोबर भात जेवावा. गाय, हैस, घोडी, हत्तीण व बकरी यांचें दूध व मांसरस यांचें, आमसोल घालून तुपाची फोडणी देऊन यूष करून त्याबरोबर जेवावें. हा विधि ज्यांचा अग्नि प्रदीप्त आहे अशा क्षयरोग्यांकरितांच सांगितला आहे. ज्यांचा अग्नि मंद असेल त्यास पुढें सांगितलेलीं दीपक पाचक औषधें द्यावीं. तसेंच ज्यांस पातळ जुलाब होत असतील त्यास ग्राहक औषधें द्यावीं.

पांचलिकं सैन्धवं शुण्ठी द्वे च सौवर्चलात्पले ।
कुडवांशानि वृक्षाम्लं दाडिमं पत्रमर्जकात् ॥ ८१ ॥

एकैकं मरिचाजाज्योर्धान्यिकाद्द्वे चतुर्थिके ।
शर्करायाः पलान्यत्र दश द्वे च प्रदापयेत् ॥ ८२ ॥
कृत्वा चूर्णमतो मात्रामन्नपाने प्रयोजयेत् ।
रोचनं दीपनं बल्यं पार्श्वार्तिश्वासकासनुत् ॥ ८३ ॥

**सैन्धवादिचूर्ण**--सैंधव व सुंठ चार चार तोळे, पादेलोण ८ तोळे, अमसोलें १६ तोळे, डाळिंबसाल १६ तोळे, आजवल्याचीं पानें १६ तोळे काळीं मिरें व काळें जिरें चार चार तोळे, धणे ८ तोळे आणि साखर ४८ तोळे या सर्व जिनसांचें चूर्ण करून एकत्र मिळवावें, आणि खाण्या पिण्याच्या पदार्थांतून वापरावें. हें रुचि देणारें, अग्निदीपक, शक्तिवर्धक आणि बरगड्यांतील दुखणें, दमा व खोकला नाहींसें करणारें आहे.

एका षोडशिका धान्याऽद्द्वद्वेजाज्यजमोदयोः ।
ताभ्यां दाडिमवृक्षाम्लद्विर्द्विः सौवर्चलात्पलम् ॥ ८४ ॥
शुण्ठ्याः कर्षं दधित्थस्य मध्यात्पञ्च पलानि च ।
तच्चूर्णं षोडश पले शर्कराया विमिश्रयेत् ।
षाडवोऽयं प्रदेयः स्यादन्नपानेषु पूर्ववत् ॥ ८५ ॥

**षाडव**--धणे १ तोळा, काळें जिरें व अजमोदा दोन तोळे, डाळिंबाची साल व अमसोलें आठ आठ तोळे, पादेलोण चार तोळे, सुंठ एक तोळा आणि कवठाचा गीर वीस तोळे या सर्वांचें चूर्ण करून त्यांत ६४ तोळे साखर मिळवून चटणी अथवा पंचामृत तयार करावें व तें वरील चूर्णा-प्रमाणें खाण्या पिण्याच्याच्या पदार्थांत वापरावें.

पिबेन्नागबलामूलस्यार्धकर्षविवर्धनम् ।
पलं क्षीरयुतं मासं क्षीरवृत्तिरनन्नभुक् ॥ ८६ ॥
एष प्रयोगः पुष्ट्यायुर्बलारोग्यकरः परः ।
मण्डूकपर्ण्याः कल्पोऽथ शुण्ठीमधुकयोस्तथा ॥ ८७ ॥

गांगेरूकीचें मूळ पहिल्या दिवशीं अर्धा तोळा, दुसऱ्या दिवशीं एक

तोळा याप्रमाणें दररोज अर्धा तोळा वाढवीत वाढवीत चार तोळा प्रमाणावर येऊन पोंचलें ह्मणजे दररोज चार तोळे प्रमाणें एक महिनाभर दुधाबरोबर घ्यावें. हें औषध घेत असतां अन्न अगदीं न खातां निव्वळ दुधावर रहावें. हा प्रयोग पुष्टि, आयु, शक्ति व आरोग्य देण्याविषयीं उत्तम आहे. याचप्रमाणें मण्डूकपर्णी, सुंठ, व ज्येष्ठमध यांचेही कल्प आहेत.

**यच्चोक्तं यक्ष्मिणां पथ्यं कासिनां रक्तपित्तिनाम् ।**
**तच्च कुर्यादपेक्ष्याग्निं व्याधिं सात्म्यबलॉस्तथा ॥ ८८ ॥**
**उपेक्षितो भवेत्तस्मिन्ननुबन्धो हि यक्ष्मणः ।**
**प्रागेवागमनात्तस्य तस्मात्तं त्वरया जयेत् ॥ ८९ ॥**

याशिवाय क्षयरोग, खोकला व रक्तपित्त या रोगांवर जे जे हितावह उपचार सांगितले आहेत ते सर्व रोग्याचा जठराग्नि, सात्म्य, शक्ति व रोगाचें मान पाहून उरःक्षतांत योजावें. उरःक्षताची हेळसांड केल्यानें त्याचा परिणाम क्षयावर जातो. करितां तितकी मजल पोंचण्यापूर्वीच त्वरेनें उरःक्षताची चिकित्सा करावी.

**क्षतक्षयसमुत्थानं सामान्यपृथगाकृतिम् ।**
**असाध्ययाप्यसाध्यत्वं साध्यानां सिद्धिमेव च ॥ ९० ॥**
**उक्तवाञ्ज्येष्ठशिष्याय क्षतक्षीणचिकित्सिते ।**
**तत्त्वार्थविद्वीतरजस्तमोदोषः पुनर्वसुः ॥ ९१ ॥**

क्षतक्षयाचीं कारणें, त्याचीं सामान्य विशेष लक्षणें, साध्य—असाध्य-याप्य भेद, आणि साध्याची चिकित्सा इतके विषय या क्षतक्षीण चिकित्साध्यायांत तत्वज्ञ, व रज—तम दोष रहित अशा आत्रेय महर्षींनीं आपल्या अग्निवेश नांवाच्या वडील शिष्यास सांगितले आहेत.

**१६ षोडशोऽध्यायः समाप्तः ।**

---

# अथ सप्तदशोऽध्यायः ।

## श्वयथुचिकित्सितम् ।

भिषग्वरिष्ठं सुरसिद्धजुष्टं मुनीन्द्रमभ्यात्मजमग्निवेशः ।
महागदस्य श्वयथोर्यथावत्प्रकोपरूपप्रशमानपृच्छत ॥ १ ॥
तस्मै जगादागदवेदसिन्धुप्रवर्तनाद्विप्रवरोऽत्रिजस्तान् ।
वातादिभेदात्रिविधस्य सम्यङ्निजानिजैकांगजसर्वजस्य ॥ २ ॥

वैद्यांत श्रेष्ठ आणि देव व सिद्ध यांनीं सेवित, असे जे आत्रेय मुनीन्द्र त्यांस त्यांचा शिष्य जो अग्निवेश त्यानें श्वयथु ह्मणजे सूज नांवाच्या महारोगाची कारणें, लक्षणें व चिकित्सा विचारिलीं असतां ते आयुर्वेद सागरतुल्य व विप्रकुलश्रेष्ठ असे आत्रेय ऋषि वातादि दोष भेदांनीं तीन प्रकारच्या आणि निज-आगन्तु भेदानें व एकांग-सर्वांग भेदानें दोन प्रकारच्या सुजेचें सविस्तर वर्णन करते झाले.

शुध्द्यामयाभक्तकृशाबलानां क्षाराम्लतीक्ष्णोष्णगुरूपसेवा ।
दध्याममृच्छाकविरोधिदुष्टगरोपसृष्टान्ननिषेवणञ्च ॥ ३ ॥
अर्शांस्यचेष्टा न च देहशुद्धिर्मर्मोपघातो विषमाप्रसूतिः ।
मिथ्योपचारः प्रतिकर्मणाञ्च निजस्य हेतुः श्वयथौ प्रदिष्टः ॥४॥
बाह्यास्त्वचोदूषयिताभिघातः काष्ठाश्मशस्त्राग्न्यशमीविषाद्यैः ।
आगन्तुहेतुस्त्रिविधो निजश्च सर्वार्धगात्रावयवाश्रितत्वात् ॥५॥
बाह्याः शिराः प्राप्य यदा कफासृक्पित्तानि सन्दूषयतीह वायुः ।
तैर्बद्धमार्गः स तदा विसर्पन्नुत्सेधलिंगं श्वयथुं करोति ॥ ६ ॥
उरः स्थितैरूर्ध्वमधस्तु वायोः स्थानास्थितैर्मध्यगतैस्तु मध्ये ।
सर्वांगगैः सर्वगते क्वचित्स्थैर्दोषैःक्वचित्स्याच्छ्वयथुस्तदाख्यः ॥७॥

वमन विरेचनादि द्वारा संशोधन, रोग किंवा उपवास या कारणांनीं कृश व अशक्त झालेल्या मनुष्यानें क्षार, आंबट, तीव्र, गरम व जड पदार्थ खाणें; दहीं, माती, शाका, कच्चे-परस्पर विरुद्ध, नासलेलें किंवा विषारी

पदार्थ मिश्रित अन्न खाणें, मूळव्याध, निश्चेष्ट बसून राहणें, शरीराची अंत-र्बाह्य मलिनता, हृदयादि मर्मस्थानीं आघात होणें, स्त्रियांचें विषम-कष्ट-मय बाळंतपण आणि वमनविरेचनादि पंच कर्मासंबंधीं करावयाचे उप-चारि नीट रीतीनें न होणें हीं दोषज सुजेचीं कारणें होत. लांकूड, दगड, शस्त्र, विस्तव, वीज, विषार इत्यादिकांच्या बाह्य आघातानें त्वचा दूषित झाली असतां आगन्तु सूज उत्पन्न होते. दोन्ही प्रकारची सूज सर्वांगावर, अर्ध्या अंगावर किंवा कांहीं विशिष्ट अवयवांस धरून येते. दुष्ट वायु कफ, रक्त व पित्त यांस दूषित करून बाहेरच्या शिरांत नेतो. त्यांच्या योगानें वायूचा मार्ग बंद होऊन तो इकडे तिकडे पसरूं लागतो. त्यामुळें ती जागा सुजते अर्थात् त्या ठिकाणीं उंचवटा उत्पन्न होतो. प्रकुपित दोष छातींत असले तर छातीच्या वरच्या भागांतून सूज येत, बस्तींत असल्यास शरीराच्या अधोभागीं सूज येते, मध्यभागीं दोष असल्यास मध्यभागीं, शरीरभर पसरले असल्यास सर्व शरीर सुजतें. सारांश ज्या जागीं प्रकुपित दोष असतील त्या जागीं सूज येते. ज्या जागीं सूज असेल त्या जागेचें नांव त्या सुजेस देतात.

उष्मा तथा स्याद्दवथुः शिराणामायाम इत्येव च पूर्वरूपम् ।
सर्वस्त्रिदोषोऽधिकदोषलिङ्गैस्तत्संज्ञमभ्येति भिषग्जितञ्च ॥ ८ ॥
सगौरवं स्यादनवस्थितत्वं सोत्सेधमुष्णाथशिरातनुत्वम् ।
सलोमहर्षाङ्गविवर्णता च सामान्यलिङ्गं श्वयथोः प्रदिष्टम् ॥९॥
चलस्तनुत्वक्परुषोऽरुणोऽसितः सुषुप्तिहर्षार्तियुतोऽनिमित्ततः ।
प्रशाम्यति प्रोन्नमति प्रपीडितो दिवाबली च श्वयथुः समी-
रणात् ॥ १० ॥
मृदुःसगन्धोऽसितपीतरागवान्भ्रमज्वरस्वेदतृषामदान्वितः ।
य उष्यतेऽस्पर्शसहोऽक्षिरागकृत्सपित्तशोथोभृशदाहपाकवान् ॥ ११ ॥

**गुरुः स्थिरः पाण्डुररोचकान्वितः प्रसेकनिद्रावमिवन्हिमान्द्यकृत् ।**
**सुकृच्छ्रजन्मप्रशमो निपीडितो नचोन्नमेद्रात्रिबलीकफान्वितः॥१२॥**

ज्या जागीं सूज यावयाची असेल त्या जागीं गरम होणें, तेथून वाफा निघाल्यासारखा भास होणें, आणि तेथील शिरा ताणणें, हीं सुजेचीं पूर्व लक्षणें होत. सूज तेवढी सान्निपातिक असते. परंतु ज्यांत जो दोष अधिक असेल त्यास त्याचें नांव देतात. व त्याच दोषास मुख्य धरून चिकित्सा केली जाते. सुजलेली जागा जड होणें, सूज एके ठिकाणीं न राहतां पसरणें, उंचवटा येणें, उष्णता, सुजलेल्या जागेच्या शिरा बारीक होणें, कांटा येणें, व आंगाचा रंग बदलणें, हीं सुजेचीं सामान्य लक्षणें होत. वाताधिक सूज एके ठिकाणीं स्थिर न राहतां पसरते, सुजलेल्या जागेची कातडी पातळ, खरखरीत, तांबूस व काळी होते, सुजलेली जागा बधिर होते, त्या जागीं कांटा येतो, वेदना होतात, निदानवर्जन केल्यानेंच लवकर बरी होते, दाबली असतां बरीच उंच होते, आणि तिचा दिवसा जोर असतो. पित्ताधिक सूज नरम असते, तीस दुर्गंध येतो, तिचा रंग काळसर, पिंवळट, तांबूस होतो, सुजलेली जागा गरम होते, स्पर्श केलेला आवडत नाहीं, डोळे तांबूस होतात, सुजेंत अतिशय आग होते, व ती पिकते आणि भ्रम, ताप, घाम, तहान व मद हे विकार होतात. कफाधिक सूज जड, न पसरणारी, पांढरुक रंगाची, कष्टानें उत्पन्न व बरी होणारी आणि वातज सुजेप्रमाणें दाबली असतां वर न उठणारी अशी असते. ही सूज रात्रीं बळावते आणि अरुचि, पडसें, अति झोंप, वांति, व अग्निमांद्य हे विकार होतात.

**कृशस्य रोगैरबलस्य यो भवेदुपद्रवैर्वा वमिपूर्वकैर्युतः ।**
**महार्तिमर्मानुगतोऽथ राजिमान्परिस्रवन्भीमबलश्च सर्वशः ॥ १३ ॥**
**अहीनमांसस्य य एकदेशजो नवोऽबलस्तस्य सुखःससाधने ।**
**निदानदोषर्तुविपर्ययक्रमैरुपाचरेत्तं बलदोषकालवित् ॥ १४ ॥**

कृश व रोगांनीं अशक्त झालेल्या मनुष्यास वमनादि उपद्रवांनीं युक्त, अत्यंत वेदनायुक्त, मर्मस्थानीं पोंचलेली, रेखायुक्त, वाहणारी आणि सर्व प्रकारें भयंकर जोरदार सूज आली असतां ती असाध्य समजावी. पुष्ट मनुष्यास आलेली, एक दोषज, नुकतीच उत्पन्न झालेली व हलकी सूज सुसाध्य असते. तिची चिकित्सा रोग व रोग्याची शक्ति, दोष आणि कालमान जाणणाऱ्या वैद्यानें रोगांचीं कारणें, दोष व ऋतु यांच्या विपरीत क्रमानें करावी.

**अथामजं लंघनपाचनक्रमैर्विशोधनैरुल्बणदोषमादितः ।**
**शिरोगतं शीर्षविरेचनैरधोविरेचनैरूर्ध्वहरैस्तथोर्ध्वजम् ॥ १५ ॥**
**उपाचरेत्स्नेहगतं विरूक्षणैः प्रकल्पयेत्स्नेहविधिञ्चरूक्षजे ।**
**विबद्धविट्केऽनिलजेनिरूहणं घृतन्तुपित्तानिलजेसतिक्तकम् ॥१६॥**
**पयश्च मूर्च्छारतिदाहतर्षिते विशोधनीये तु समूत्रमिष्यते ।**
**कफोत्थितं क्षारकटूष्णसंयुतैः समूत्रतक्रासवयुक्तिभिर्जयेत् ॥ १७ ॥**

आमदोषजनित सुजेवर प्रथम लंघनपाचनादि उपचार करावे. दोष फार वाढलेले असल्यास वमन-विरेचनादिकांनीं संशोधन करावें. मस्तकांत दोष असल्यास शिरोविरेचन अर्थात् नस्य द्यावें. शरीराच्या अधोभागीं दोष असल्यास जुलाब द्यावे. आणि वरच्या भागांत असल्यास वमन करवावें. अति स्निग्ध आहारादिकांनीं उत्पन्न झालेल्या सुजेवर रूक्ष क्रिया करावी, आणि रूक्षतेनें आलेल्या सुजेवर स्निग्ध उपचार करावे. मलावरोधयुक्त वातज सुजेंत निरूहबस्ति द्यावा आणि वातपित्तज सुजेंत तिक्तघृत द्यावें. मूर्च्छा, बेचैनी, दाह व तृषा हे विकार होत असल्यास दूध द्यावें व अशा प्रकारच्या रोग्यास संशोधन देणें असल्यास गोमूत्र मिळवून द्यावें. कफजन्य सुजेंत क्षार, तिखट व गरम औषधें मिळवून गोमूत्र, ताक व आसवें यांचा उपयोग करावा.

**ग्राम्यानूपं पिशितलवणं शुष्कशाकं नवान्नम् ।**
**गौडं पिष्टं दधितिलकृतं विज्जलं मद्यमम्लम् ।**

धानावल्लूरमशनमथो गुर्वसात्म्यं विदाहि ।
स्वप्नं रात्रौ श्वयथुगदवान्वर्जयेन्मैथुनञ्च ॥ १८ ॥

ग्राम्य व पाणथळ देशांत राहणाऱ्या जनावरांचें मांस, मीठ, सुक्या भाज्या, नवें धान्य, गूळ, पिठाचे पदार्थ, दहीं, तिळाचे पदार्थ, चिकट पदार्थ, आंबट मद्य, पोहे किंवा भाजलेले जव, सुकविलेलें मांस, जड, न सोसणारे व विदाही पदार्थ, रात्रींची झोप, व स्त्रीसंग इतक्या गोष्टी सूज आलेल्या मनुष्यानें वर्ज्य कराव्या.

व्योषं त्रिवृत्तिक्तकरोहिणी च सायोरजस्का त्रिफलारसेन ।
पीतं कफोत्थं शमयेत्तु शोफं मूत्रेणगव्येन हरीतकी वा ॥ १९ ॥
हरीतकी नागर देवदारुमुस्ताम्बुयुक्तं सपुनर्नवंवा ।
सर्वं पिबेत्रिष्वपि मूत्रयुक्तं स्नानश्चजीर्णे पयसान्नमद्यात् ॥ २० ॥
पुनर्नवानागरमुस्तकल्कान्प्रस्थेन धीरः पयसोऽक्षमात्रान् ।
मयूरकं मागधिकां समूलां सनागरां वा प्रपिबेत्सवाते ॥ २१ ॥
दन्तीत्रिवृत्र्यूषणचित्रकैर्वा पयः शृतं दोषहरं पिबेन्ना ।
द्विप्रस्थमात्रं च पलाधिकैस्तैरर्धावशिष्टं पवने सपित्ते ॥ २२ ॥
सशुण्ठिपीतद्रुरसं प्रयोज्यं श्यामारुबूकोषणसाधितं वा ।
त्वग्दारुवर्षाभुमहौषधैर्वा गुडूचिकानागरदन्तिभिर्वा ॥ २३ ॥
सप्ताहमौष्ट्रं यदि वापि मासं पयःपिबेद्भोजनवारिवर्जी ।
गव्यं समूत्रं महिषीपयो वा क्षीराशनो मूत्रमथोगवांवा ॥ २४ ॥
तक्रं पिबेद्वा गुरुभिन्नवर्चाः सव्योषसौवर्चलमाक्षिकं वा ।
गुडाभयां वा गुडनागरांवा सदोषभिन्नामविबद्धवर्चाः ॥ २५ ॥
विड्वातसङ्गे पयसा रसैर्वा प्राग्भुक्तमद्यादुबूकतैलम् ।
स्रोतोविबन्धेऽग्निरुचिप्रणाशे मद्यान्यरिष्टांश्चपिबेत्सुजातान् ॥२६॥

सुंठ, मिरें, पिंपळी, निशोत्तर, कुटकी, व लोहचूर्ण त्रिफळ्याच्या काढ्यां-

तून घ्यावें किंवा गोमूत्रांतून हिरडयांचें चूर्ण घ्यावें, ह्मणजे कफजन्य सूज बरी होते. अथवा हिरडे, सुंठ, देवदार यांचें किंवा हीं तीन औषधें आणि वेटूळी यांचें चूर्ण कोमट पाण्याबरोबर खावें. हेंच चूर्ण तिन्हीं दोषांपासून होणाऱ्या सुजेवर गोमूत्रांतून घ्यावें. आणि तें जिरल्यावर स्नान करून दूधभात जेवावा. वातकफादिक सुजेवर घेटूळी व नागरमोथा एक एक तोळा घेऊन त्याच्या कल्कानें एक शेर दूध सिद्ध करून तें प्यावें. किंवा अघाडयाचें मूळ, पिंपळी, पिंपळमूळ, व सुंठ ह्या औषधांनीं दूध सिद्ध करून प्यावें. किंवा दन्तीमूळ, निशोत्तर, त्रिकटु व चित्रक हीं औषधें घालून कढविलेलें दूध प्यावें. हें दोषहरण करतें. वातपित्तजन्य सुजेवर हींच औषधें दोन दोन तोळे घालून दोन शेर दूध उकळावें व आटून अर्धे शिल्लक राहिलें ह्मणजे प्यावें. किंवा सुंठ व सरल देवदार; काळें निशोत्तर, एरंडमूळ व त्रिकटु; दालचिनी, देवदार, घेटुळी व सुंठ; अथवा गुळवेल, सुंठ व दंतीमूळ या औषधांनीं दूध कढवून प्यावें. सात दिवस किंवा एक महिनाभर अन्न पाणी अगदींच वर्ज्य करून नुस्त्या उंटिणीच्या दुधावर रहावें. गाईचें किंवा ह्मशीचें दूध गोमूत्र घालून प्यावें. किंवा गोमूत्र पिऊन दुधावर रहावें. ज्या रोग्यास जड किंवा पातळ शौचास होत असेल त्यानें त्रिकटु, पादेलोण व मध मिळवून ताक प्यावें. दोषयुक्त, पातळ, आम किंवा अवष्टंभयुक्त शौचास होत असल्यास हिरडयाचें किंवा सुंठीचें चूर्ण गुळाबरोबर घ्यावें. ( वर ताक प्यावें. ) सुजेंत मल व अधोवायुचा अवरोध झाला असतां जेवणापूर्वीं दूध किंवा ( जांगल जनावरांच्या मांसाच्या ) रसांबरोबर एरंडेल तेल घ्यावें. स्रोतें अवरुद्ध झालीं, आणि अग्नि व रुचि नाः असतां जुनीं मद्यें व अरिष्टें द्यावीं.

**गण्डीर भल्लातकचित्रकांश्च व्योषं विडंगं बृहतीद्वयंच ।**
**द्विप्रस्थिकं गोमयपावकेन द्रोणे पचेत्कांचिकमस्तुनस्तु ॥ २७ ॥**
**त्रिभागशेषंच सुपूतशीतं द्रोणेन तत्साकृतमस्तुना च ।**

**सितोपलायाश्च शतेन युक्तं लिप्ते घटे चित्रकपिप्पलीनाम् ॥ २८ ॥**
**वैहायसे स्थापितमादशाहात्प्रयोजयँस्तद्विनिहन्तिशोफान् ।**
**भगन्दरार्शः कृमिकुष्ठमेहान्वैवर्ण्यकार्श्यानिलहिक्कनश्च ॥ २९ ॥**

**गण्डीराद्यरिष्ट**—गण्डीर, बिबे, चित्रक, त्रिकटु, वावडिंग, रिंगणी व डोरली हीं सर्व मिळून दोन शेर घेऊन दूध व दहीं एकत्र शिजविल्यानें जें मिश्रण बनतें त्याच्या १६ शेर निवळींत मिळवून गोवऱ्याच्या विस्तवावर कढत ठेवावी. आटतां आटतां तिसरा हिस्सा काढा राहिला ह्मणजे चांगला गाळून घेऊन निववावा. नंतर त्यांत ताकाची निवळी १६ शेर व खडीसाखर ४०० तोळे मिळवून चित्रक व पिंपळीचा मडक्यास आंतून लेप करून त्या मडक्यांत तें सर्व मिश्रण भरून मडकें दहा दिवसपर्यंत खळग्यांत पुरून ठेवावें. ह्मणजे गण्डीरारिष्ट तयार झालें. हें सूज, भगंदर, मूळव्याध, कृमि, कुष्ठ, प्रमेह, निस्तेजपणा, कृशता, वातविकार आणि उचकी यांस नाहींसें करितें.

**काश्मर्यधात्रीमरिचाभयानां द्राक्षाफलानां च सपिप्पलीनाम् ।**
**शतं शतं जीर्णगुडात्तुलांच सङ्क्षुद्यकुम्भे मधुना प्रलिप्ते ॥ ३० ॥**
**सप्ताहमुष्णे द्विगुणंतु शीते स्थितं जलद्रोणयुतं पिबेन्ना ।**
**शोफान्विबन्धान्कफवातजाँश्च सहन्त्यरिष्टोऽष्टशतोऽग्निकृच्च ॥ ३१ ॥**

**काश्मर्याद्यरिष्ट**—शिवणीचीं फळें, आंवळे, काळीं मिरें, हिरडे, काळीं द्राक्षें व पिंपळी हीं प्रत्येकीं शंभर आणि जुना गूळ ४०० तोळे सर्व एकत्र कुटून त्यांत १६ शेर पाणी घालावें आणि एका मडक्यास आंतल्या अंगानें मधाचा लेप करून, त्यांत तें भरून ठेवावें. गरम जागेंत किंवा ऋतूंत ७ दिवस आणि थंड जागेंत किंवा ऋतूंत १४ दिवसपर्यंत बंद ठेवून नंतर सेवन करावें. हें अरिष्ट सूज व कफवातजन्य विबंध नाहींसा करून अग्नि प्रदीप्त करितें.

**पुनर्नवे द्वे च बले सपाठे दन्तीं गुडूचीमथ चित्रकंच ।**
**निदिग्धिकांच त्रिपलानि पक्त्वा द्रोणार्धशेषेसलिलेततस्तम् ॥ ३२ ॥**

पूत्वा रसं द्वे च गुडात्पुराणात्तुले मधुप्रस्थयुतं सुशीतम् ।
मासं निदध्याद्घृतभाजनस्थं पले यवानां परितस्तु मासान् ॥३३॥
चूर्णीकृतैरर्धपलांशिकैस्तं पत्रत्वगेला मरिचाम्बुलोहैः ।
गन्धान्वितं क्षौद्रघृतप्रदिग्धैर्जीर्णे पिबेद्व्याधिबलं समीक्ष्य ॥ ३४ ॥
हृत्पाण्डुरोगं श्वयथुं प्रवृद्धं प्लीहभ्रमारोचकमेहगुल्मान् ।
भगन्दरं षड्जठराणि कासं श्वासं ग्रहण्यामयकुष्ठकण्डूः ॥ ३५ ॥
शाखानिलं बद्धपुरीषतां च हिक्कां किलासं च हलीमकं च ।
क्षिप्रं जयेद्वर्णबलायुरोजस्तेजोन्वितो मांसरसान्नभोक्ता ॥ ३६ ॥

**पुनर्नवाद्यरिष्ट**—पांढरी व तांबडी घेटुळी, चिकणा व गांगेरुकी, पहाडमूळ, दन्तीमूळ, गुळवेल, चित्रक व रिंगणी हीं सर्व औषधें १२।१२ तोळे घेऊन ६४ शेर पाण्यांत त्यांचा काढा करावा. ८ शेर पाणी शिल्लक राहिलें ह्मणजे गाळून घेऊन निवलें ह्मणजे त्यांत ८०० तोळे जुना गूळ व एक शेर मध घालून तुपानें राबलेल्या मडक्यांत भरून जवांच्या पेंढ्यांत महिनाभर पुरून ठेवावें. नंतर तमालपत्र, वेलची, काळीं मिरें, वाळा व अगर यांचें दोन तोळे चूर्ण त्यांत घालून तें सुगंधित करावें. आणि मग रोगाचें मान व रोग्याची शक्ति पाहून मध व तूप मिळवून घ्यावें. हें पुनर्नवारिष्ट हृद्रोग, पांडुरोग, फार वाढलेली सूज, पानथरी, भ्रम, अरुचि प्रमेह, गुल्म, भगन्दर, सहा प्रकारचे उदररोग, खोकला, दमा, संग्रहणी, खाज, शाखावायु, मलावरोध, उचकी, किलास, हलीमकश्वास यांस लवकर जिंकतें. हें अरिष्ट सेवन करून मांसरसाचें भोजन केल्यास कांति व शक्ति वाढते, तारुण्य कायम राहतें, आणि ओज व तेज यांची वृद्धि होतें.

फलत्रिकं दीप्यकचित्रकौ च सपिप्पली लोहरजो विडंगम् ।
चूर्णीकृतं कौडविकं द्विरंशं क्षौद्रं पुराणस्य तुलां गुडस्य ।
मासं निदध्याद्घृतभाजनस्थं यवेषु तानेव निहन्ति रोगान् ॥३७॥

**त्रिफलाद्यरिष्ट**—हिरडा, बेहडा, आंवळकठी, ओंवा, चित्रक, पिंपळी,

लोहचूर्ण व वावडिंग हीं प्रत्येकीं १६ तोळे घेऊन त्यांचें चूर्ण करावें. त्यांत अर्धाशेर मध आणि ४०० तोळे जुना गूळ घालून तें सर्व मिश्रण तुपानें रावलेल्या मडक्यांत भरून जवांच्या राशींत महिनाभर पुरून ठेवावें. हेंही पुनर्नवारिष्टाप्रमाणेंच गुणदायक आहे.

ये चार्शसां पाण्डुविकारिणांच प्रोक्ताः शुभाः शोफिषुतेऽप्यरिष्ठाः ।
कृष्णा सपाठा गजपिप्पलीच निदिग्धिका चित्रकनागरे च ॥ ३८॥
सपिप्पलीमूलरजन्यजाजी मुस्तंच चूर्णं सुखतोयपीतम् ।
हन्यात्रिदोषं चिरजञ्च शोफं कल्कश्चभूनिम्बमहौषधस्य ॥ ३९ ॥
अयोरजस्त्र्यूषणयावशूकं चूर्णंच पीतं त्रिफलारसेन ।
क्षारद्वयं स्याल्लवणानि चत्वार्ययोरजो व्योषफलत्रिकञ्च ॥ ४० ॥
सपिप्पलीमूलविडंगसारं मुस्ताजमोदामरदारुबिल्वम् ।
कलिंगकाश्चित्रकमूलपाठं सयष्टिकं चातिविषं पलांशम् ॥ ४१ ॥
साहिंगुकर्षं त्वनुसूक्ष्मचूर्णं द्रोणं यथामूलकशुण्ठिकानाम् ।
स्याद्भस्मनस्तत्सलिलेन साध्यमालोड्ययावद्घनमप्रदग्धम् ॥ ४२ ॥
स्त्यानं ततः कोलसमान्तु मात्रां कृत्वा सुशुष्कां विधिना भजेत ।
प्लीहोदरश्वित्रहलीमकाँस्तु पांड्वामयारोचकशोषशोफान् ।
विषूचिकागुल्मगराश्मरीश्च सश्वासकासाः प्रणुदेत्सकुष्ठाः ॥ ४३ ॥

याशिवाय मूळव्याधीवर व पांडुविकारावर जीं जीं अरिष्टें सांगितलीं आहेत तीं ही सुजेवर हितावह आहेत. पिंपळी, पहाडमूळ, गजपिंपळी, रिंगणीमूळ, चित्रक, सुंठ, पिंपळीमूळ, हळद, काळें जिरें, व नागरमोथा यांचें चूर्ण कोमट पाण्याबरोबर प्याल्यानें पुष्कळ दिवसांची त्रिदोषजन्य सूजही बरी होते. कडूकिराईत व सुंठ यांचा कल्क ऊन पाण्याबरोबर प्याल्यानेंही सदरहू गुण येतो. लोहचूर्ण, त्रिकटु व जवखार त्रिफळ्याच्या काढ्यांतून घ्यावा ह्मणजे हाच गुण येतो. **क्षारगुटिका**—सज्जीखार, जवखार, सैंधव, पादेलोण, बिडलोण, उद्भिद्लोण, लोहचूर्ण, त्रिकटु, त्रिफळा, पिंपळमूळ, सालें काढलेलीं वावडिंगें, नागर-

मोथा, अजमोदा, देवदार, कोंवळीं बेलफळें, इंद्रजव, चित्रकमूळ, पहाडमूळ, ज्येष्ठमध, व अतिविष हीं औषधें प्रत्येकीं चार चार तोळे व हिंग १ तोळा घेऊन सर्वांचें बारीक चूर्ण करावें. नंतर सुकलेले मुळे व सुंठ यांची १६ शेर राख करून त्यांत हें चूर्ण मिळवावें आणि पाणी घालून चांगलें दाट व चिकट होईपर्यंत शिजवून बोरा एवढ्या गोळ्या करून सुकवून ठेवाव्या आणि विधिवत् सेवन कराव्या. या क्षारगुटिका पानथरी, उदर, सफेद कुष्ठ, हलीमक, पाण्डुरोग, अरुचि, क्षय, सूज, विषूचिका, गुल्म, विषदोष, मूत्राश्मरी, दमा, खोकला व कुष्ठ या विकारांस नष्ट करितात.

प्रयोजयेदार्द्रकनागरं वा तुल्यं गुडेनार्धपलाभिवृध्द्या।
मात्रापलं पञ्चपलानि मासं जीर्णे पयोयूषरसान्नभोक्ता ॥ ४४ ॥
गुल्मोदरार्शः श्वयथुप्रमेहान्श्वासप्रतिश्यालसकाविपाकान्।
सकामलांशोष मनोविकारान्कासं कफञ्चैव जयेत्प्रयोगः ॥ ४५ ॥

गुडार्द्रकप्रयोग—आज दोन तोळे, उद्यां चार तोळे, याप्रमाणें दररोज दोन दोन तोळे आलें वाढवीत वीस तोळ्यापर्यंत पोंचावें. नंतर दररोज वीस तोळेप्रमाणें एक महिनाभर घेत जावें. दररोज जितकें आलें असेल तितकाच त्यांत गूळ घालीत जावें. हें जिरल्यावर दूध, कढणें, व मांसरसाबरोबर जेवावें. हा आल्याचा प्रयोग गुल्म, उदर, मूळव्याध, सूज, प्रमेह, दमा, पडसें, अलसक, अपचन, कावीळ, शोष, मनोविकार, खोकला व कफ या विकारांस हटवितो.

रसस्तथैवार्द्रकनागरस्य पेयोऽथ जीर्णे पयसान्नमद्यात्।
जत्वश्मजञ्च त्रिफलारसेन हन्यात्रिदोषं श्वयथुं प्रसह्य ॥ ४६ ॥

वरील आल्याच्या प्रयोगाप्रमाणेंच आल्याच्या रसाचा प्रयोग करावा आणि तो जिरल्यावर दूधभात जेवावा. शिलाजतुप्रयोग—त्रिफळ्याच्या काढ्यांतून शिलजित घेत जावा. तो त्रिदोषजन्य सूज जोरानें हटवितो.

द्विपञ्चमूलस्य पचेत्कषाये कंसेऽभयानांच शतं गुडस्य।
लेहे सुसिद्धे च विनीय चूर्णं व्योषं त्रिसौगन्ध्यमुषां स्थिते च ॥ ४७ ॥

प्रस्थार्धमात्रं मधुनः सुशीते किञ्चिच्च चूर्णादपियावशूकात् ।
एकाभयां प्राश्य ततश्च लेहाच्छुक्तिं निहान्ति श्वयथुं प्रवृद्धम् ॥ ४८ ॥
श्वासज्वरारोचकमेहहिक्काप्लीहात्रिदोषोदरपाण्डुरोगान् ।
कार्श्यामवातानसृगम्लपित्तं वैवर्ण्यमूत्रानिलशुक्रदोषान् ॥ ४९ ॥

**कंसहरीतकी**—दशमुळांच्या ५१२ तोळे काढ्यांत शंभर हिरडे आणि ४०० तोळे गूळ घालून सर्व मिश्रण शिजवून लेह तयार करावा. लेह तयार होण्याच्या बेतांत आला ह्मणजे त्यांत सुंठ, मिरें, पिंपळी, वेलची, दालचिनी व तमालपत्र या सर्व जिनसांचें चूर्ण घालावें. लेह निवल्यावर त्यांत ६४ तोळे मध आणि थोडा जवखार घालावा. यांतून दररोज एक हरडा व दोन तोळे अवलेह सेवन केल्यानें फार वाढलेली सूज, दमा, ताप, अरुचि, प्रमेह, उचकी, पानथरी, त्रिदोष, उदर, पांडु, कृशता, आमवात, रक्तपित्त, फिकटपणा आणि मत्र, वायु व वीर्य यांसंबंधीं विकार नाहींसे होतात.

पटोलमूला सुरदारुदन्ती त्रायन्ति पिप्पल्यभयाविशालाः ।
यष्ट्याह्विका तिक्तकरोहिणीच सचन्दना स्यात्रिवुलानि दार्वी ॥ ५०
कर्षोत्थितैस्तैः क्वथितः कषायो घृतस्य पेयः कुडवेन युक्तः ।
विसर्पदाहज्वरसन्निपातांस्तृष्णां विषाणि श्वयथुं निहन्ति ॥ ५१ ॥

**पटोलादिघृत**—कडूपडवळीचें मूळ, देवदार, दन्तीमूळ, त्रायमाण, पिंपळी, हिरडे, कडूवृंदावनाचें मूळ, ज्येष्ठमध, कुटकी, चन्दन, पाणवेत व दारुहळद हीं सर्व औषधें प्रत्येकीं एक एक तोळा घेऊन त्यांचा काढा करून त्यांत एक शेर तूप सिद्ध करून तें प्यालें असतां विसर्प, दाह, ताप, सन्निपात, तृषा, विष व सूज यांचा नाश होतो.

सचित्रकं धान्ययवान्यजाजी सौवर्चलं व्यूषणवेतसाम्लम् ।
बिल्वात्फलं दाडिमयावशूकौ सपिप्पलीमूलमथापि चव्यम् ॥ ५२ ॥
पिष्ट्वाक्षमात्राणि जलाढकेन पक्त्वा घृतप्रस्थमथो प्रयुञ्ज्यात् ।
अर्शांसि गुल्मं श्वयथुञ्च दुःखं तद्धन्ति वन्हिञ्च करोति दीप्तम् ॥ ५३ ॥

**चित्रकादिघृत**—चित्रक, धणे, ओंवा, जिरें, पादेलोण, सुंठ, मिरें, पिंपळी, अम्लवेतस, बेलफळाचा गर, डाळिंब, जवखार, पिंपळीमूळ व चवक हीं सर्व

द्रव्यें प्रत्येकीं एक एक तोळा घेऊन बारीक वाटून चार शेर पाण्यांत शिजवून त्यांत एक शेर तूप सिद्ध करावें. या घृताच्या सेवनानें मूळव्याध, गुल्म, सूज व पीडा, हीं नाहींशीं होऊन जठराग्नि प्रदीप्त होतो:

**पिबेद्घृतं वाष्टगुणाम्बुसिद्धं सचित्रकक्षारमुदारवीर्यम्।**
**कल्याणकं वापि सपञ्चगव्यं तिक्तं महद्वाप्यथ तिक्तकं वा ॥ ५४ ॥**

**चित्रकादिघृत**—चित्रकमूळ व जोरदार जवखार घालून आठपट पाण्यांत तूप सिद्ध करून घ्यावें. किंवा कल्याणघृत, पञ्चगव्यघृत, तिक्तघृत अथवा महातिक्तघृत घ्यावें.

**क्षीरं घटे चित्रकल्कलिप्ते दध्यागतं साधुविमथ्यते च।**
**तज्जं घृतं चित्रकमूलगर्भं तक्रेण सिद्धं श्वयथुघ्नमग्र्यम् ॥ ५५ ॥**
**अर्शोऽतिसारानिलगुल्ममेहाँश्चेतन्निहन्त्याग्निबलप्रदञ्च।**
**तक्रेण वाऽद्यात्सघृतेन तेन भोज्यानि सिद्धामथवा यवागूम ॥ ५६ ॥**

**चित्रक घृत**—चित्रकाच्या मुळाची साल बारीक वाटून ती एका मडक्याच्या आंतल्या बाजूनें थापावी. नंतर त्यांत दूध तापवून विरजावें. त्याचें दहीं घुसळून लोणी काढून तें कढवून तूप करावें व तें, चित्रक मुळाची साल आणि ताक घालून सिद्ध करावें. हें घृत उत्कृष्ट प्रकारचें सूज नाश करणारें आहे. यानें मूळव्याध, अतिसार, वातगुल्म, प्रमेह हे नाहींसे होतात, व जठराग्नि प्रदीप्त होतो. सदरहू तूप व ताकाबरोबर खाण्याचे पदार्थ सेवन करावे किंवा यांनीं कण्हेरी सिद्ध करून घ्यावी.

**जीवन्त्यजाजीशटिपुष्कराह्वैः सकारवीचित्रकबिल्वमध्यैः।**
**सयावशूकैर्बदरप्रमाणैर्वृक्षाम्लयुक्ता घृततैलभृष्टाः ॥ ५७ ॥**
**अर्शोऽतिसारानिलगुल्मशोफहृद्रोगमन्दाग्निहितायवागूः।**
**या पञ्चकोलैर्विधिनैव तेन सिद्धाभवेत्साच समा तयैव ॥ ५८ ॥**
**कुलत्थयूषश्च सपिप्पलीको मौद्गश्च सत्र्यूषणयावशूकः।**
**रसस्तथाविष्किरजाङ्गलानां सकूर्मगोधाशिखिशल्लकानाम् ॥ ५९ ॥**
**सुवर्चिका गृञ्जनकं पटोलं सवायसीमूलकवेत्रनिम्बम्।**
**शाकार्थिनां शाकमतिप्रशस्तं भोज्यं पुराणश्च यवः सशालिः ॥ ६० ॥**

आभ्यन्तरं भेषजमुक्तमेतद्बहिर्हितं यच्छृणु तद्यथावत् ।
स्नेहान्प्रदेहान्परिषेचनानि स्वेदांश्च वातप्रबलांश्च कुर्यात् ॥ ६१ ॥

हरणदोडी, जिरें, कचोरा, पुष्करमूळ, काळें जिरें, चित्रकमूळ, बेलफळाचा गीर, जवखार, हीं सर्व औषधें प्रत्येकीं आठ मासे घेऊन त्यांचा काढा करावा व त्यांत आमसोलें घालून तुपाची किंवा तेलाची फोडणी देऊन, कण्हेरी तयार करून घ्यावी. ही मूळव्याध, अतिसार, वातगुल्म, सूज, हृद्रोग, व अग्निमान्द्य या रोगांवर हितकर आहे. याच रीतीनें पंचकोल ह्मणजे चवक, चित्रक, पिंपळी, पिंपळीमूळ व सुंठ हीं द्रव्यें टाकून सिद्ध केलेल्या कण्हेरींतही हेच गुण आहेत. पिंपळीमिश्रित कुळथांचें कढण, त्रिकटु व जवखार मिश्रित मुगांचें कढण; विष्किर व जांगल मांसाचा अथवा कांसव, पाणघोरपड, मोर, साळई यांच्या मांसाचे शोरुवेही हितकर आहेत. सूज आलेल्या रोग्यांस भाज्या खावयाच्या असल्यास अळशी, गाजर, कडू पडवळ, कावळी, मुळे, वेत व कडूलिंब या भाज्या फार प्रशस्त आहेत. खावयास जुने जव व साळीचे तांदूळ द्यावे. येथपर्यंत पोटांत घ्यावयाचीं औषधें सांगितलीं. आतां बाह्य उपचार सांगतों ते श्रवण कर. वाताधिक सुजेवर स्नेहन, लेप, परिषेक व स्वेद हे उपचार करावे.

शैलेयकुष्ठागुरुदारुकौन्ती त्वक्पद्मकैलाम्बुपलाशमुस्तैः ।
प्रियङ्गुथौणेयकहेममांसीतालीसपत्रप्लवपत्रधान्यैः ॥ ६२ ॥
श्रीवेष्टकध्यामकपिप्पलीभिः स्पृक्कानखैश्चैव यथोपलाभम् ।
वातान्वितेऽभ्यङ्गमुषन्ति तैलं सिद्धं सुपिष्टैरपिच प्रदेहम् ॥ ६३ ॥

**शैलेयादि तैल**—दगडफूल, कोष्ठ, अगर, देवदार, रेणुकबीज, दालचिनी, पद्मकाष्ठ, वेलची, वाळा, पळस, नागरमोथा, गव्हला, थुणेर, नागकेशर, जटामांसी, तालीसपत्र, केवटीमोथा, तमालपत्र, धणे, देवदाराचा डीक अथवा गंधाबिरोजा, रोहिसगवत, पिंपळी, पिंडिका अथवा नेवाळी, व नखला यांपैकीं जितकीं औषधें मिळूं शकतील तितकीं घेऊन त्यानें तेल सिद्ध करून तें सुजलेल्या जागीं चोळावें. तसेंच सदरहू औषधें बारीक वाटून लेप लावावा.

जलैश्च वार्साककरञ्जशिग्रुकाश्मर्यपत्रार्जकजैश्च सिद्धैः ।
स्विन्नो मृदूष्णो रवितप्ततोयस्नातश्च गन्धैरनुलेपनीयः ॥ ६४ ॥
सवेतसाः क्षीरवतां द्रुमाणां त्वचः समञ्जिष्ठलतामृणालाः ।
सचन्दनाः पद्मकवालकौ च पैत्ते प्रदेहस्तु सतैलपाकः ॥ ६५ ॥
आक्तस्य तेनाम्बुरविप्रततं सचन्दनं साभयपद्मकञ्च ।
स्नाने मतं क्षीरवतां कषायः क्षीरोदकं चन्दनलेपनञ्च ॥ ६६ ॥
कफे तु कृष्णा सिकता पुराणा पिण्याकशिग्रुत्वगुमाप्रलेपः ।
कुलत्थशुण्ठीजलमूत्रसेकश्चण्डागुरुभ्यामनुलेपनञ्च ॥ ६७ ॥
बिभीतकानां फलमध्यलेपः सर्वेषु दाहार्तिहरः प्रलेपः ।
यष्ट्याह्वमुस्तैः सकपित्थपत्रैः सचन्दनैस्तत्पिडकासुलेपः ॥ ६८ ॥
रास्नावृषार्कत्रिफलाविडङ्गशिग्रुत्वचो मूषिककर्णिकाच ।
निंबार्जकौ व्याघ्रनखः सदूर्वा सुवर्चला तिक्तकरोहिणीच ॥ ६९ ॥
सकाकमांचा बृहती सकुष्ठा पुनर्नवा चित्रकनागरे च ।
उन्मर्दनं शोफिषु मूत्रपिष्टं शस्तस्तथा मूलकतोयसेकः ॥ ७० ॥

अडूळसा, रुई, करंज, शेवगा, शिवण, व अजवला यांचीं पानें घालून तापविलेल्या सुखोष्ण पाण्याचा वाफारा घेऊन घाम आणावा. नंतर उन्हांत तापविलेल्या पाण्यानें स्नान करून सुगंधि द्रव्यांची उटी लावावी. वेत, वड, उंबर, पिंपळ, पारोसापिंपळ, पिंपरी यांच्या साली, मंजिष्ठ, गहुला, कमळाच्या देंठी, चन्दन, पद्मकाष्ठ व वाळा या औषधांचा पित्ताधिक सुजेंत लेप करावा व याच औषधांनीं तेल सिद्ध करून तें आंगास चोळावें. तेल मर्दन करून चन्दन, हिरडे, पद्मकाष्ठ यांचा कल्क पाण्यांत मिळवून तें पाणी उन्हांत तापवून त्यानें स्नान करावें. किंवा वर सांगितलेल्या वड, उंबर वगेरे क्षीरीवृक्षांची साल घालून तापविलेल्या पाण्यानें स्नान करावें. किंवा क्षीरोदक मिश्रणानें स्नान करावें व अंगास चंदनाचा लेप करावा. कफाधिक सुजत पिंपळीचें चूर्ण, निदान एक वर्षाची जुनी तिळांची पेंड, शेवग्याची साल व अळशी यांचा लेप करावा. कुळीथ व सुंठीचा काढा आणि गोमूत्र यांनीं धुवावें व नंतर चोरक नामक सुगंधिद्रव्य आणि अगर यांची उटी लावावी. बेहड्याची बी

वाटून लावली असतां सर्व प्रकारच्या सुजेंतील दाह व पीडा नाहींशी होते. सुजेंत फोड आले असल्यास त्यांवर ज्येष्ठमध, नागरमोथा, कंवठीचीं पानें व चंदन यांचा लेप करावा. रास्ना, अडूळसा, रुईचीं पानें, त्रिफळा, वावडिंग, शेवग्याची साल, उंदीरकानी किंवा द्रवंती, कडूलिंब, अजवला, वाघनखें, दूर्वा-सूर्यमुखी, कुटकी, कावळी, डोरली, पुनर्नवा, चित्रक, व सुंठ हीं द्रव्यें गोमूत्रांत वाटून सुजेवर चोळावीं व मुळ्यांच्या कढणानें सुजलेला भाग भिजवावा.

शोफास्तु गात्रावयवाश्रिता ये ते स्थानदूष्याकृतिनामभेदात् ।
अनेकसंख्याः कतिचिच्च तेषां निदर्शनार्थं शृणु चोच्यमानात् ॥ ७१ ॥
दोषास्त्रयः स्वैः कुपिता निदानैः कुर्वन्ति शोफांश्छिरसः सुघोरान् ।
अन्तर्गले घुर्घुरिकान्वितं च शालूकमुच्छ्वासनिरोधनानि ॥ ७२ ॥
गलस्य सन्धौ चिबुके गले ज सदाहरागश्वसनासु चोग्रः ।
शोफो भृशार्तिस्तु बिडालिका स्याद्धन्याद्गले चेद्वलयीकृता स्यात ॥ ७३॥
स्यात्तालुविद्रध्यपि दाहरागैर्युता भवेत्तालुनि सा त्रिदोषात् ।
जिह्वोपरिष्टादुपजिह्विका स्यात् कफादधस्तादधिजिह्विका च ॥ ७४ ॥
यो दन्तमांसेषु तु रक्तपित्तात् पाको भवेत् सोपकुशः प्रदिष्टः ।
स्याद्दन्तविद्रध्यपि दन्तमांसे शोफः कफाच्छोणितसंचयोत्थः ॥ ७५ ॥
गलस्य पार्श्वे गलगण्ड एकः स्याद्गण्डमाला बहुभिस्तु गण्डैः ।
साध्याः स्मृताः पीनसपार्श्वशूलकासज्वरच्छर्दियुतास्त्वसाध्याः ॥ ७६ ॥

येथपर्यंत सर्वांगसुजेविषयीं निरूपण केलें. आतां शरीराच्या निरनिराळ्या अवयवांच्या ठिकाणीं जी सूज येते तिचे स्थान, दूषित झालेले धातु, आकार व नांव यांच्या भेदानें अनेक प्रकार होतात. त्यांपैकीं उदाहरणार्थ कांहीं येथें सांगतों. वातादि तिन्ही दोष आपापल्या प्रकोपक कारणांनीं कुपित होत्साते शिरोभागीं भयंकर सूज उत्पन्न करितात. गळ्यांत सूज उत्पन्न होऊन घरघर शब्द होतो व श्वासमार्ग अवरुद्ध होतो. त्यास शालूक ह्मणतात. गळ्याच्या संधीच्या ठिकाणीं हनुवटीवर व गळ्यांत दाहयुक्त आणि लाल रंगाची जबर सूज येते व तींत अत्यंत पीडा असते तीस बिडालिका ह्मणतात. गळ्यांत

वलयाकार-वाटोळी सूज येते ती प्राणनाश करिते. त्रिदोषप्रकोपानें टाळूचे ठिकाणीं दाहयुक्त व आरक्त वर्णाची सूज येते तीस तालुविद्रधि ह्मणतात. कफप्रकोपानें जिभेच्या वरच्या बाजूस सूज येते तीस उपजिव्हिका ह्मणतात व खालच्या बाजूस येते तीस अधिजिव्हिका ह्मणतात. रक्तपित्तदोषानें दांतांच्या हिरड्या पिकतात त्यास उपकुश ह्मणतात. कफदोषानें रक्त सांचून हिरड्या सुजतात त्यास दन्तविद्रधि ह्मणतात. गळ्याच्या बाजूस गांठी-सारखी सूज येते तीस गलगण्ड ह्मणतात. पुष्कळ गांठी असल्यास गण्डमाला ह्मणतात. गण्डमालांत पीनस, बरगड्या दुखणें, खोकला, ताप व उलटी हे उपद्रव होत असल्यास असाध्य व उपद्रवरहित असल्यास साध्य समजाव्या.

तेषां शिराकायशिरोविरेकाः धूमः पुराणस्य घृतस्य पानम् ।
सलङ्घनं वक्त्रभवेषु चापि प्रघर्षणं स्यात् कवलग्रहश्च ॥ ७७ ॥
अङ्गैकदेशेष्वनिलादिभिः स्यात् स्वरूपधारी स्फुरणः शिराभिः ।
ग्रन्थिर्महान्मांसभवस्त्वनर्तिर्मेदोभवः स्निग्धतमश्चलश्च ॥ ७८ ॥
तं शोधितं स्वेदितमश्मकाष्ठैः साङ्गुष्ठदण्डैर्विनयेदपक्वम् ।
विपाट्य चोत्कृत्य भिषक् सकोपं शस्त्रेण दग्ध्वा व्रणवच्चिकित्सेत् ॥७९॥
अदग्ध ईषत् परिशोषितश्च प्रयाति भूयोऽपि शनैर्विवृद्धिम् ।
तस्मादशेषः कुशलैः समन्ताच्छेद्यो भवेद्वीक्ष्य शरीरदेशान् ॥ ८० ॥
शेषे कृते पाकवशेन शीर्यैस्ततः क्षतोत्थः प्रसरेद्विसर्पः ।
उपद्रवं तं प्रतिवार्यतज्ज्ञः स्वैर्भेषजैः पूर्वतरैर्यथोक्तैः ॥ ८१ ॥
ततः क्रमेणास्य यथाविधानं व्रणं व्रणज्ञस्त्वरया चिकित्सेत् ।

वर सांगितलेल्या सुजेच्या प्रकारांत शीर फोडून रक्त काढणें, वमन, विरेचन, नस्य, धूमपान, जुनें तूप पिणें व लंघन आणि तोंडांतील सुजेंत सूज नाहींशी करणाऱ्या द्रव्यांची पूड चोळणें व तोंडांत त्यांचे कवल धरणें हे उपाय करावे. वातादि दोष प्रकुपित होऊन शरीराच्या कोणत्या तरी एका भागावर त्या त्या दोषाच्या लक्षणांनीं युक्त अशा शिराश्रित पुळ्या होतात. मांसाश्रित दोषांपासून मोठ्या गांठी उत्पन्न होतात व त्यांत वेदना होत नाहींत. मेदाश्रित दोषापासून अतिशय गुळगुळीत व पसरणाऱ्या गांठी

येतात. त्या अपक्व असतां त्यांचें शोधन करून तापलेल्या दगडानें किंवा पेटलेल्या लांकडानें शेकून, घाम येऊन त्या नरम झाल्या ह्मणजे आंगठा किंवा लांकडाचा दांडा यांनीं चोळून बसवून टाकाव्या. त्या आंतून पिकून पोकळ झाल्यास शस्त्रानें चिरून डाग देऊन त्यांची व्रणा-सारखी चिकित्सा करावी. पुरतें शोधन न होतां अर्धवट बसून गेलेली गांठ डाग न देतां तशीच राहूं दिल्यास ती मागून हळू हळू वाढून बरीच मोठी होते. ह्मणून विचक्षण वैद्यानें सुजेची जागा नीट पाहून गांठ चारी बाजूनें चांगली चिरावी. गांठ चिरल्यानंतर दोष शिल्लक राहिल्यामुळें ती पिकून फुटल्यास जखम होऊन त्यापासून विसर्प उत्पन्न होतो. अशा प्रसंगीं कुशल वैद्यानें, मागें विसर्पाध्यायांत सांगितलेल्या उपायांनीं प्रथम विसर्प बरा करावा आणि नंतर यथाविधि व्रणाचें स्वरूप जाणणाऱ्या वैद्यानें सत्वर व्रणाची चिकित्सा करावी.

विवर्जयेत्कुक्ष्युदराश्रितं च तथा गले मर्मणि संश्रितं च ॥ ८२ ॥
स्थूलः खरश्चापि भवेद्विवर्ज्यो यश्चापि बालस्थविराबलानाम् ।
ग्रन्थ्यर्बुदानां च यतोऽविशेषः प्रदेशहेत्वाकृतिदोषदूष्यैः ॥ ८३ ॥
ततश्चिकित्सेद्भिषगर्बुदानि विधानविद्ग्रन्थिचिकित्सितेन ।
ताम्रा सशूला पिडका भवेद् या सात्वालजीनामपरिस्रुताग्रा ॥ ८४॥
शोफः कृतश्चर्मनखान्तरे स्यान्मांसास्रदूषी भृशशीघ्रपाकः ।
ज्वरान्विता वङ्क्षणकक्षजा या वर्तिर्निरर्तिः कठिनायता च ॥ ८५ ॥
विदारिका सा कफमारुताभ्यां तेषां यथादोषमुपक्रमः स्यात् ।
विस्रावणं पिण्डिकयोपनाहः पक्केषु चैव व्रणवच्चिकित्सा ॥ ८६ ॥
विस्फोटकः सर्वशरीरजाः स्युः स्फोटास्तु रागज्वरतर्षयुक्ताः ।
यज्ञोपवीतप्रतिमाः प्रभूताः पित्तानिलाल्लाजनिभास्तु कक्षाः ॥ ८७॥

कुक्षि, उदर, गळा व मर्मस्थानें यांत झालेल्या, मोठ्या व खडबडीत, आणि लहान मुलें, वृद्ध व अशक्त मनुष्यास झालेल्या गांठी असाध्य समजून सोडून द्याव्या. गांठी व अर्बुद या दोहोंचीं स्थानें, कारणें, आकार, उत्पादक दोष व दूषित होणारे धातु हे एकच असतात. ह्मणून वैद्यानें अर्बुदाची

चिकित्सा गांठी सारखीच करावी. तांबूस रंगाच्या व दुखणाऱ्या अशा ज्या पुळ्या होतात त्यांस अलजी ह्मणतात. यांचीं तोंडें वाहत असतात. नख चर्माच्या आंतल्या बाजूस मांस व रक्तास दूषित करणारी आणि अत्यंत व लवकर पिकणारी अशी सूज येते. ( तीस नखुरडें किंवा चिप्प ह्मणतात ) कफ–वातदोषानें जांघाड्यांत किंवा कांखेंत वाटोळी, जळजळणारी, टणक व ताठलेली अशी गांठ येते, तीस विदारिका ह्मणतात. ही झाली असतां ताप येतो. हिची दोषानुसार चिकित्सा करावी. रक्त काढवावें, पोटीस बांधून पिकवावी आणि पिकून फुटली ह्मणजे व्रणाप्रमाणें चिकित्सा करावी. सर्वांगावर लाल लाल फोड येतात त्यांस विस्फोटक ह्मणतात. यांत ताप येतो व तहान फार लागते. वातपित्त दोषानें जानव्याप्रमाणें धनुषाकार स्नायांसारख्या पुष्कळशा पुळ्या येतात त्यांस कक्षा ह्मणतात.

याश्चापराः स्युः पिडकाः प्रकीर्णाः स्थूलाणुमध्या अपि पित्तजास्ताः ।
सर्वत्र गात्रेषु मसूरमात्र्यो मसूरिकाः पित्तकफात्प्रदिष्टाः ॥ ८८ ॥
विसर्पशान्त्यै विहिता क्रिया या तां तासु कुष्ठेषु हितां विदध्यात् ।
व्रध्नानिलाद्यैर्वृषणे स्वलिङ्गैरंत्राभ्निरेति प्रविशेन्मुहुश्च ॥ ८९ ॥
मूत्रेण पूर्णं मृदुमेदसा तु स्निग्धं च विद्यात्कठिनं च शोथम् ।
विरेचनाभ्यङ्गनिरूहलेपाः पक्केषु चैव व्रणवच्चिकित्सा ॥ ९० ॥
स्यान्मूत्रसेकः कफजं विपाच्य विशोध्य सीव्यं व्रणवच्च पक्कम् ।

याशिवाय पित्तदोषानें लहान, मोठ्या, मध्यम आकाराच्या व दाट अशा पुळ्या येतात. पित्तकफदोषानें सर्वांगावर मसुरांसारख्या लाल व तशाच आकाराच्या दाट पुळ्या येतात त्यांस मसूरिका ह्मणतात. यांवर, विसर्प व कुष्ठांवर सांगितलेली चिकित्सा करावी. वातादि दोष प्रकुपित होऊन आपापल्या लक्षणांनीं युक्त होत्साते आंतड्यांतून जोरानें निघून अंडकोशांत प्रवेश करितात व अंडकोशांतून परत आंतड्यांत येतात. याप्रमाणें सतत संचार चालू असतो. यामुळें अंडकोश मोठे होतात. त्यांत मूत्र भरलेलें असल्यास ते नरम लागतात, व चरबी भरलेली असल्यास गुळगुळीत, चिकट व कठिण

लागतात. यांवर प्रथम रेचन, तैलमर्दन, निरूहबस्ति व लेप हे उपाय करावे. पिकल्यास व्रणासारखी चिकित्सा करावी. मूत्र भरलें असल्यास तें शस्त्रानें छेद करून काढून टाकावें आणि कफजन्य वृद्धि असल्यास चिरून त्यांतील सर्व चरबी वगैरे काढून तें शुद्ध झालें ह्मणजे शिवून टाकावें. तें पिकल्यास व्रणाप्रमाणें चिकित्सा करावी.

कृम्यस्थिसूक्ष्मक्षणनव्यवायप्रवाहणान्युत्कटुकाश्वपृष्ठैः ॥ ९१ ॥
गुदस्य पार्श्वे पिडका भृशार्तिः पक्वप्रभिन्ना तु भगन्दरः स्यात् ।
विरेचनं चैषणपाटनं च विशुद्धमार्गस्य च तैलदाहः ॥ ९२ ॥
स्यात्क्षारमूत्रेण सुपाचितेन छिन्नस्य चास्य व्रणवच्चिकित्सा ।
जङ्घासुपिण्डीप्रपदोपरिष्टात्स्यात् श्लीपदं मांसकफास्रदोषात् ॥ ९३ ॥
शिराकफघ्नश्च विधिः समग्रस्तत्रेष्यते सर्षपलेपनं च ।
मन्दास्तु पित्तप्रबलाः प्रदिष्टा दोषाः सुतीव्रं तनुरक्तपाकम् ॥ ९४ ॥
कुर्वन्ति शोथं ज्वरतर्षयुक्तं विसर्पणं जालकगर्दभाख्यम् ।
विलङ्घनं रक्तविमोक्षणं च विरूक्षणं कायविरेचनं च ॥ ९५ ॥
धात्रीप्रयोगांश्छिशिरान्प्रदेहान्कुर्यात्सदा जालकगर्दभस्य ।
एवंविधांश्चाप्यपरान्निशम्य शोथप्रकारानानिलादिलिङ्गैः ॥ ९६ ॥
शान्ति नयेद्दोषहरैर्यथास्वमालेपनच्छेदनभेददाहैः ।
प्रायोऽभिघातादनिलः सरक्तः शोथं सरागं प्रकरोति तत्र ।
वीसर्पनुन्मारुतरक्तनुच्च कार्यं विषघ्नं विषजे च कर्म ॥ ९७ ॥

कृमींच्यां चावण्यानें, हाड मोडून चूर झाल्यानें, मैथुनानें, परसाकडच्या वेळीं कुंथण्यानें, उकिडवें बसण्यानें, घोडा, उंट वगैरे जनावरांच्या पाठीवर बसून प्रवास करतांना गुदद्वाराच्या आजूबाजूची चामडी घासल्यानें मलद्वाराच्या बाजूस पुळी होते. तींत अतिशय वेदना होते व ती पिकून फुटली ह्मणजे तेथें व्रण होतो. त्यास भगंदर ह्मणतात. भगंदरांत रेचन द्यावें, सळई घालावी, चिरावें, आंतील दोष वाहून जाऊन मार्ग शुद्ध झाला ह्मणजे क्षार व गोमूत्र घालून सिद्ध केलेल्या तेलानें दहन करावें आणि यानें जें छिद्र होईल

त्याची व्रणासारखी चिकित्सा करावी. पायांच्या बोटांच्या वर पोटऱ्यांपर्यंत मांस, कफ व रक्त यांच्या विकृतीनें जी सूज येते तीस श्लीपद ह्मणतात. यावर एकंदर सिराव्यधविधि व कफनाशक क्रिया कराव्या आणि शिरसांचा लेप करावा. पित्ताधिक मन्द दोष तीव्र, पातळ, आरक्त, पिकणारी व पसरणारी अशी सूज उत्पन्न करितात. तीस जालकगर्दभ ह्मणतात. यावर लंघन, रक्त काढणें, रूक्षण, रेचन, आंवळ्यांचे प्रयोग व थंडगार लेप हे उपचार करावे. याशिवायही इतर अनेक प्रकारची सूज वातादि दोषांनीं उत्पन्न होते. त्याची तत्तद्दोषनाशक लेप, छेदन, भेदन, दाह वगैरे उपायांनीं चिकित्सा करावी. शरीरावर कोणत्याही प्रकारचा आघात झाल्यानें तेथील वायु व रक्त दूषित होऊन ती जागा लाल होते व सुजते त्यावर विसर्पनाशक व कुष्ठनाशक चिकित्सा करावी. विषारी सुजेवर विषनाशक उपाय करावे.

**त्रिविधस्य दोषभेदात्सर्वार्धावयवगात्रभेदाच्च ।**
**श्वयथोर्द्विविधस्य तथा लिङ्गानि चिकित्सितं चोक्तम् ॥ ९८ ॥**

वातादि दोषभेदानें आणि सर्वांग, अर्धांग व प्रत्यंगभेदानें तीन प्रकारच्या आणि निज व आगंतु या दोन प्रकारच्या सुजेचीं लक्षणें व चिकित्सा हीं या श्वयथुचिकित्साध्यायांत सांगितलीं आहेत.

इति सप्तदशोऽध्यायः समाप्तः

---

## अथ अष्टादशोऽध्यायः ।

---

**अथात उदरचिकित्सितं व्याख्यास्यामः ।**
**इति ह स्माह भगवानात्रेयः ॥**

आतां उदरचिकित्सा सांगतों. आत्रेय ऋषि असेंच सांगते झाले.

**सिद्धविद्याधराकीर्णे कैलासे नन्दनोपमे ।**
**तप्यमानं तपस्तीव्रं साक्षाद्धर्ममिव स्थितम् ॥ १ ॥**
**आयुर्वेदविदां श्रेष्ठं भिषग्विद्याप्रवर्तकम् ।**

पुनर्वसुं जितात्मानमग्निवेशोऽब्रवीद्वचः ॥ २ ॥
भगवन्नुदरैर्दुःखैर्दृश्यन्ते ह्यर्दिता नराः ।
शुष्कवक्त्राः कृशैर्गात्रैराध्मातोदरकुक्षयः ॥ ३ ॥
प्रनष्टाग्निबलाहाराः सर्वचेष्टास्वनीश्वराः ।
दीनाः प्रतिक्रियाभावाज्जहतोऽसूननाथवत् ॥ ४ ॥
तेषामायतनं संख्यां प्राग्रूपाकृतिभेषजान् ।
यथावज्ज्ञातुमिच्छामि गुरुणा सम्यगीरितम् ॥ ५ ॥
सर्वभूतहितायर्षिः शिष्येणैवं प्रचोदितः ।
सर्वभूतहितं वाक्यं व्याहर्तुमुपचक्रमे ॥ ६ ॥

सिद्ध व विद्याधरांनीं व्याप्त, व इन्द्राच्या नन्दनवनाप्रमाणें शोभायमान अशा कैलास पर्वतावर विराजमान असलेले, तीव्र तप करणारे, प्रत्यक्ष धर्ममूर्ति आयुर्वेद जाणणाऱ्यांचे शिरोमणि, आयुर्वेदप्रवर्तक व जितात्मा असे जे आत्रेय महर्षि त्यांस अग्निवेश ह्मणाला–हे भगवन्! उदररोगांनीं पीडित असलेले मनुष्य असे पाहण्यांत येतात कीं त्यांची तोंडें कोरडीं पडलीं आहेत. हातपाय वगैरे अवयव रोडावलेले आहेत, पोट व कुशी फुगलेल्या आहेत, जठराग्नि व आहार नाहींसा झाला आहे, अंगांत कोणतेंही काम करण्याची शक्ति उरलेली नाहीं, व सर्व प्रकारें दीन होऊन रोगाचा प्रतीकार न झाल्यास कांहीं काळानें ते अनाथ मनुष्याप्रमाणें प्राण सोडतात. अशा प्रकारच्या उदररोगांचीं कारणें, संख्या, पूर्वरूप, लक्षणें व औषधें हीं गुरुमुखानें यथावत् समजून घेण्याची इच्छा आहे. तरी आपण कृपा करून निरूपण करावें. याप्रमाणें शिष्यानें प्रार्थना केल्यावरून आत्रेय महर्षि प्राणिमात्रांच्या कल्याणाकरितां पुढील निरूपण करूं लागले.

अग्निदोषान्मनुष्याणां रोगसङ्घाः पृथग्विधाः ।
मलवृध्द्या प्रवर्तन्ते विशेषेणोदराणि तु ॥ ७ ॥
मन्देऽग्नौ मलिनैर्भुक्तैरपाकाद्दोषसंचयः ।
प्राणाग्न्यपानान्संदूष्य मार्गान्बद्ध्वोत्तरोत्तरान् ॥ ८ ॥

त्वङ्मांसान्तरमागम्य कुक्षिमाध्मापयन्भृशम् ।
जनयत्युदरं तस्य हेतुं शृणु सलक्षणम् ॥ ९ ॥

मनुष्यास जे अनेक प्रकारचे रोग होतात ते सर्व जठराग्नि बिघडल्यानें व दोष वाढल्यानेंच होतात. तथापि त्यांतल्या त्यांत उदररोग तर मुख्यत्वें करून याच कारणांनीं होतात. अग्नि मन्द असतां, नासलेलें, शिळें किंवा अशाच तऱ्हेचें घाणेरडें अन्न खाल्ल्यानें व अजीर्णापासून, वातादि दोष सांचून ते प्राणवायु, जठराग्नि, अपानवायु यांस दूषित करून, त्यांचे उत्तरोत्तर मार्ग बंद करून, स्वयं त्वचा व मांस यांच्यामध्यें शिरून, कूस अतिशय फुगवून, उदर उत्पन्न करितात. आतां उदराचीं कारणें व लक्षणें सांगतों तीं ऐक.

अत्युष्णलवणक्षारविदाह्यम्लरसाशनात् ।
मिथ्यासंसर्जनाद्रूक्षाविरुद्धाशुचिभोजनात् ॥ १० ॥
प्लीहार्शोग्रहणीदोषकर्षणात्कर्मविभ्रमात् ।
क्लिष्टानामप्रतीकाराद्रौक्ष्याद्वेगविधारणात् ॥ ११ ॥
स्रोतसां दूषणादामात्संक्षोभादतिपूरणात् ।
अर्शोवलिशकृद्रोधादंत्रस्फुटनभेदनात् ॥ १२ ॥
अतिसंचितदोषाणां पापं कर्म च कुर्वताम् ।
उदराण्युपजायन्ते मन्दाग्नीनां विशेषतः ॥ १३ ॥

**कारणें**—उष्ण, खारट, क्षार, विदाही व आंबट पदार्थांच्या अति सेवनानें, वमनविरेचनादि पंचकर्मानंतर करावयाच्या पेयादिक्रमांत चूक झाल्यानें, रूक्ष, परस्पर विरुद्ध, किंवा अपवित्र अन्न खाल्ल्यानें, पानथरी—मूळव्याध—संग्रहणी या विकारांनीं मनुष्य अगदीं अशक्त झाल्यानें, वमन—विरेचनादि पंचकर्मांत चूक झाल्यानें, कष्टसाध्य रोगांची चिकित्सा न केल्यानें, रूक्षतेनें, मलमूत्रादिकांचे वेग थांबवून धरल्यानें, स्रोतें दूषित झाल्यानें, आमांशानें, क्रोध शोक वगैऱ्यांनीं चित्त क्षुब्ध झाल्यानें, अति भोजनानें, मूळव्याधीच्या वळयांच्या योगानें मलाचा अवरोध झाल्यानें, आंतडीं फुटल्यानें किंवा तुटल्यानें, दोष अतिशय सांचल्यानें आणि पापकर्म केल्यानें उदररोग उत्पन्न होतो

व ज्यांचा अग्नि मंद आहे अशा मनुष्यांस तो विशेषें करून होतो.

क्षुन्नाशः स्वाद्वतिस्निग्धगुर्वन्नं पच्यते चिरात् ।
भुक्तं विदाह्यते सर्वं जीर्णाजीर्णं न वेत्ति च ॥ १४ ॥
सहते नातिसौहित्यमीषच्छोफश्च पादयोः ।
शश्वद्बलक्षयोऽल्पेऽपि व्यायामे श्वासमृच्छति ॥ १५ ॥
पुरीषनिचयो वृध्दिरुदावर्तकृता च रुक् ।
बस्तिसन्धौ रुगाध्मानं वर्धते पाट्यतेऽपि च ॥ १६ ॥
आतन्यते च जठरमपि लघ्वल्पभोजनात् ।
राजीजन्म वलीनाश इति लिङ्गं भविष्यताम् ॥ १७ ॥

पूर्वरूप—भूक नाहींशी होणें, गोड-अति स्निग्ध व जड अन्न उशिरां पचणें, कांहीं खाल्लें तरी जळजळ होणें, अन्न पचलें किंवा नाहीं हें न कळणें, पोटभर खाल्लें असतां न सोसणें, पाय किंचित् सुजणें, शक्ति कमी होत जाणें, थोडीशी मेहनत केली तरी दम लागणें, मलवृद्धि होऊन तो सांचणें, उदावर्तजन्य शूळ होणें, बस्तिसंधींत दुखणें, फुगणें, फाटल्यासारखी पीडा होणें, हलकें व थोडें अन्न खाल्लें तरी पोटास तडस लागणें, पोटावर रेघा दिसूं लागणें व वळ्या नाहींशा होणें हीं उदराचीं पूर्वलक्षणें होत; ह्मणजे हीं लक्षणें होऊं लागलीं असतां पुढें उदर होणार आहे असें समजावें.

रुध्द्वा स्वेदाम्बुवाहीनि दोषाः स्रोतांसि संचिताः ।
प्राणापानान्हि संदूष्य जनयन्त्युदरं नृणाम् ॥ १८ ॥
कुक्षेराध्मानमाटोपः शोफः पादकरस्य च ।
मन्दोऽग्निः श्लक्ष्णगण्डत्वं कार्श्यं चोदरलक्षणम् ॥ १९ ॥
पृथग्दोषैः समस्तैश्च प्लीहबन्धक्षतोदकैः ।
संभवन्त्युदराण्यष्ट तेषां लिङ्गं पृथक् शृणु ॥ २० ॥

संचित झालेले दोष स्वेदवाही व जलवाही स्रोतांचा अवरोध करून, प्राण व अपानवायूंस दूषित करून उदररोग उत्पन्न करितात. कूस फुगणें, पोटांत गुरगुरणें, हात-पाय सुजणें, अग्नि मंद होणें, गाल गुळगुळीत

लागणें, व कृशता हीं उदराचीं सामान्य लक्षणें होत. वातोदर, पित्तोदर, कफोदर, सान्निपातिकोदर, प्लीहोदर, बद्धोदर, क्षतोदर व जलोदर येणें-प्रमाणें एकंदर आठ प्रकारचीं उदरें होतात. त्या प्रत्येकाचीं निरनिराळीं लक्षणें सांगतों तीं ऐक.

**रूक्षाल्पभोजनायासवेगोदावर्तकर्शनैः ।**
**वायुः प्रकुपितः कुक्षिहृद्बस्तिगुदमार्गगः ॥ २१ ॥**
**हत्वाग्निं कफमुध्दूय तेन रुध्दगतिस्तथा ।**
**आचिनोत्युदरं जन्तोस्त्वङ्मांसान्तरमाश्रितः ॥ २२ ॥**

रूक्ष व थोडें अन्न खाणें, परिश्रम, मलमूत्रादिकांच्या वेगांचा अवरोध, उदावर्त व रोगांनीं अशक्त होणें, या कारणांनीं कुपित झालेला वायु, उदर, हृदय, बस्ति व गुद यांच्या मार्गांत जाऊन, अग्नीस नष्ट करून, कफास हालवून सोडतो. त्या योगानें त्याची स्वतःची गति बंद झाली ह्मणजे त्वचा व मांस यांच्या दरम्यान शिरून बसून पोट वाढवीत जातो. यास वातोदर ह्मणतात.

**तस्य रूपाणि—कुक्षिपाणिपादवृषणश्वयथूदरविपाटनमनियतौ च वृध्दि-ह्रासौ कुक्षिपार्श्वशूलोदावर्त्ताङ्गमर्दपर्वभेदशुष्ककासकार्श्यदौर्बल्यारोचकाविपाका अधोगुरुत्वं वातवर्चोमूत्रसङ्गः श्यावारुणत्वं नखनयनवदनत्वङ्मूत्रवर्चसामपि चोदरं तन्वासितराजीशिरासन्ततमाहतमाध्मातदृतिशब्दवच्चवति । वायुश्चोर्ध्वमधस्तिर्यक् च सशूलशब्दश्चरति एतद्वातोदरं विद्यात् ॥ २३ ॥**

त्याचीं लक्षणें—कूस, हात, पाय व वृषण सुजतात, पोट फाटल्यासारखें वाटतें, कधीं वाढतें, कधीं कमी होतें, कुशी व बरगड्या दुखतात, उदावर्त होतें, अंग मोडतें, सांधे फुटतात, सुका खोकला, कृशता, अशक्तता, अरुचि, अपचन, पोटाच्या खालचा भाग जड वाटतो, अधोवायु—मल व मूत्र यांचा अवरोध, नखें—डोळे—तोंड—त्वचा—मूत्र व मल यांचा रंग काळा व अरुण होतो, पोट बारीक व काळ्या रंगाच्या रेषांनीं व शिरांनीं व्याप्त होतें व टिचकी

मारली असतां फुगलेल्या भात्यासारखा आवाज होतो. या वातोदरांत वायु वर-खालीं-तिरपा चहूंकडे शूळ व शब्द करीत फिरतो.

कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णाग्न्यातपसेवनैः ।
विदाह्यध्यशनाजीर्णैश्चाशु पित्तं समाचितम् ॥ २४ ॥
प्राप्यानिलकफौ रुद्ध्वा मार्गमुन्मार्गमास्थितम् ।
निहत्यामाशये वह्निं जनयत्युदरं ततः ॥ २५ ॥

तिखट, आंबट, खारट, अतिशय उष्ण व तीक्ष्ण पदार्थांच्या अति सेवनानें, अग्नि किंवा ऊन्ह फार घेतल्यानें, विदाही पदार्थ खाल्ल्यानें, अजीर्णावर जेवल्यानें व अजीर्णानें पित्त वाढून, तें वातकफाशीं मिळून त्याचा नियमित मार्ग बंद झाल्यानें उन्मार्गगामी होऊन वाटेल तिकडे फिरूं लागतें व आमाशयांतील जठराग्नीचा नाश करून उदर उत्पन्न करितें.

तस्य रूपाणि—दाहज्वरतृष्णामूर्च्छातिसारभ्रमाः कटुकास्यत्वं हरितहारिद्रत्वं नखनयनवदनत्वङ्मूत्रवर्चसामपि चोदरं नीलपीतहारिद्रहरितताम्रराजीशिरावनध्दं दह्यात् दूषयते धूप्यते उष्मायते स्विद्यते क्लिद्यते मृदुस्पर्शं क्षिप्रपाकं च भवत्येतत् पित्तोदरं विद्यात् ॥ २६ ॥

त्याचीं लक्षणें—दाह, ताप, तहान, मूर्च्छा, अतिसार, भोंवळ, तोंड कडू होणें, नखें-डोळे-तोंड-त्वचा मूत्र व मल यांचा रंग हिरवा-पिंवळा होणें, पोट-निळ्या, पिंवळ्या, हळदीच्या रंगाच्या, हिरव्या व तांबूस रंगाच्या रेघा व शिरांनीं आच्छादित होणें, पोटांत आग होणें, विस्तवाचा शेक लागल्याप्रमाणे वाटणें, धूर निघाल्याप्रमाणें होणें, पोट कढत होणें, पोटास घाम येणें, पोट ओलसर-चिकट लागणें, हातास मऊ लागणें व लवकर पिकणें हीं होत.

अव्यायामदिवास्वप्नस्वाद्वतिस्निग्धपिच्छिलैः ।
दधिदुग्धोदकानूपमांसैश्चात्युपसेवितैः ॥ २७ ॥
क्रुद्धेन श्लेष्मणा स्रोतःस्वाहतेष्वावृतोऽनिलः ।
तमेव पीडयन् कुर्यादुदरं बहिरंत्रगः ॥ २८ ॥

परिश्रम न करणें, दिवसा निजणें, गोड—अतिशय स्निग्ध व चिकट—बुळबुळीत पदार्थ ; दहीं, दूध, पाणी, व पाणथळ जनावरांचें मांस अतिशय खाणें, या कारणांनीं कफदोष प्रकुपित होऊन स्रोतें बंद करितो. त्या योगानें वायूचा मार्ग बंद होऊन तो बाह्य अन्त्रांत प्रवेश करून कफास पीडित करितो. त्या योगानें कफोदर उत्पन्न होतें.

तस्य रूपाणि—गौरवारोचकाविपाकाङ्गमर्दसुप्तिपाणिपादमुष्कोरुशोफोत्क्लेशनिद्राकासश्वासाः शुक्लत्वं च नखनयनवदनत्वङ्मूत्रवर्चसामपि चोदरं शुक्लराजीशिरासन्ततं गुरु स्तिमितास्थिरं कठिनं भवत्येतच्छ्लेष्मोदरं विद्यात् ॥ २९ ॥

त्याचीं लक्षणें—अंग जड होणें, अरुचि, अपचन, अंग मोडून येणें, सुनबाहिरी ( स्पर्शज्ञान न होणें ); हात, पाय, वृषण व मांड्या सुजणें; उह्रासे, झोंप, खोकला, दमा, नखें, डोळे, तोंड, त्वचा, मूत्र व मल यांचा रंग पांढरा होणें, पोटावर पांढऱ्या रंगाच्या रेघा व शिरांचें जाळें पसरणें; आणि पोट जड, ओल्सर, स्थिर व कठिण लागणें हीं—होतात.

दुर्बलाग्नेरपथ्यामविरोधिगुरुभोजनात् ।
स्त्रीदत्तैश्च रजोरोमविण्मूत्रास्थिनखादिभिः ॥ ३० ॥
विषैश्च मन्दैर्वाताद्याः कुपिताः संचितास्त्रयः ।
शनैः कोष्ठे प्रकुर्वन्तो जनयन्त्युदरं नृणाम् ॥ ३१ ॥

अशक्त जठराग्नीच्या मनुष्यानें अपथ्य, कच्चें, विरुद्ध व जड अन्न खाल्ल्यानें बायका, पुरुषांस मोहन-वशीकरण वगैरे प्रयोग करण्याकरितां रज, केंस, मल, मूत्र, हाडें, नखें वगैरे न कळत खाऊं घालतात तीं खाल्ल्यानें; आणि सर्पादिकांच्या किंवा उद्भिज्ज-खनिज विषाच्या योगानें वातादि तिन्ही दोष प्रकुपित होऊन कोठ्यांत सांचतात व उदर उत्पन्न करितात. हें सान्निपातिक उदर होय.

तस्य रूपाणि—सर्वेषामेव दोषाणां समस्तानि लिङ्गान्युपलभ्यन्ते वर्णाश्च नखादिषू दरमपि नानावर्णराजीशिरासन्ततं भवत्येतत्सान्निपातोदरं विद्यात् ॥ ३२ ॥

त्याचीं लक्षणें—यांत तिन्ही दोषांचीं लक्षणें असून, नखें–डोळे वगैरेंचे रंगही त्रिदोषजनित उदराप्रमाणेंच असतात. पोटही अनेक रंगाच्या शिरांनीं आच्छादित असतें.

आशितस्यातिसंक्षोभाद्यानयानाभिचेष्टितैः ।
अतिव्यवायभाराध्ववमनव्याधिकर्शनैः ॥ ३३ ॥
वामपार्श्वाश्रितः प्लीहा च्युतः स्थानात्प्रवर्धते ।
शोणितं वा रसादिभ्यो विवृद्धं तं विवर्धयेत ॥ ३४ ॥

यथेच्छ जेवून घोड्यावर किंवा गाडींत बसून फिरल्यामुळें अथवा दुसरीं कांहीं कष्टजनक कामें करून संक्षोभ झाल्यानें अतिमैथुन, फार ओझा वाहणें, अतिशय चालणें, वांति किंवा रोग यांनीं कृशता आल्यानें, डाव्या कुशींतील कौळू आपल्या स्थानापासून सुटून वाढते; किंवा रसादिकांच्या योगानें वाढलेलें रक्त तीस वाढवितें.

इति तस्य प्लीहा कठिनोऽष्ठीलेवादौ वर्धमानः कच्छपसंस्थान उपलभ्यते स चोपेक्षितः क्रमेण कुक्षिं जठरमग्न्यधिष्ठानं च परिक्षिपन्नुदरमभिनिर्वर्तयति ॥ ३५ ॥

यांत कौळू प्रथम एखाद्या फळांतील आठळीप्रमाणें कठिण लागते. व तीच पुढें वाढून कांसवाच्या पाठीप्रमाणें हातास लागते. तिची उपेक्षा केल्यास ती हळू हळू कुशी, पोट व पक्काशय यांवर आपला पगडा बसवून उदर उत्पन्न करिते. हें प्लीहोदर होय.

तस्य रूपाणि—दौर्बल्यारोचकाविपाकवर्चोमूत्रग्रहतमःप्रवेशपिपासाङ्गमर्दच्छर्दिमूर्च्छाङ्गसादकासश्वासमृदुज्वरानाहाग्निनाशकार्श्यास्यवैरस्यपर्वभेदकोष्ठवातशूलान्यपि चोदरमरुणवर्णं वा नीलहरितहारिद्रराजिमद्भवति । एवमेव यकृदपि दक्षिणपार्श्वस्थं कुर्यात् । तुल्यहेतुलिङ्गौषधत्वात्तस्य प्लीहजठर एवावरोध इत्येतद्यकृत्प्लीहोदरं विद्यात् ॥ ३६ ॥

याचीं लक्षणें—अशक्तता, अरुचि, अपचन, मल-मूत्राचा अवरोध, डोळ्यांपुढें काळोखी येणें, तहान, अंग मोडणें, ओकारी, मूर्च्छा, हात पाय

गळणें, खोकला, दमा, बारीक ताप, पोट फुगणें, जठराग्नीचा नाश, कृशता, तोंड बेचव होणें, सांधे फुटणें, कोष्ठवात व शूळ हीं होऊन पोट अरुण वर्णाचें होतें किंवा पोटाचा मूळचा रंग बदलून दुसराच कोणता तरी रंग होतो आणि त्यावर निळ्या, हिरव्या व हळदीच्या रंगाच्या रेघांचें जाळें पसरलेलें असतें. याचप्रमाणें उजव्या कुशींतील यकृत् आपल्या स्थानापासून च्युत झालें असतां उदर उत्पन्न करितें. यकृदुदराचीं कारणें, लक्षणें व औषधें एकसारखींच असल्यामुळें याचा प्लीहोदरांतच समावेश करून यकृत्प्लीहोदर एकच मानलें आहे.

पक्ष्मबालैः सहान्नेन भुक्तै बद्धायने गुदे ।
उदावर्तैस्तथाऽर्शोभिरंत्रसंमूर्च्छनेन वा ॥ ३७ ॥
अपाने मार्गसंरोधाद्धत्वाग्निं कुपितोऽनिलः ।
वर्चःपित्तकफान् रुध्द्वा जनयत्युदरं ततः ॥ ३८ ॥

पापण्याचे केंस किंवा इतर अंगावरचे केंस अन्ना बरोबर खाल्ले गेल्यानें, उदावर्तानें, मूळव्याधीनें किंवा आंतड्यांस चिकटून राहणारे पदार्थ खाल्ल्यानें, गुदद्वार बंद होऊन व त्यामुळें अपान वायूचा मार्ग बंद झाल्यानें तो कुपित होऊन अग्नीस नष्ट करून, मल-पित्त व कफाचा अवरोध करून उदर उत्पन्न करितो.

तस्य रूपाणि—तृष्णादाहज्वरमुखतालुशोषोरुसादकासश्वासदौर्बल्यारोचकाविपाकवर्चोमूत्रसङ्गाध्मानच्छर्दिक्षवथुशिरोहृन्नाभिगुदशूलान्यपि चोदरं मृदुत्वं स्थिरमरुणं नीलराजिशिरावनद्धमराजिकं वा प्रायो नाभ्युपरि गोपुच्छवदभिनिवर्तते इत्येतद्बद्धगुदोदरं विद्यात् ॥ ३९ ॥

त्याचीं लक्षणें—तहान, दाह, ताप, तोंडास व टाळूस कोरड, मांड्या गळणें, खोकला, दमा, अशक्तता, अरुचि, अपचन, मल-मूत्रावरोध, पोट फुगणें, ओकारी, शिंका येणें, डोकें—हृदय,—बेंबी व गुद यांत शूळ होणें, पोटांत वायु स्तब्ध राहणें, पोट ताठ, अरुण वर्णाचें, निळ्या रंगाच्या रेघा व शिरांनीं व्यापलेलें किंवा मुळींच रेघा नसलेलें असें होणें आणि बेंबीच्या वरच्या भागीं गायीच्या शेपटासारखा आकार होणें-हीं होतात. यास बद्धगुदोदर ह्मणतात.

शर्करातृणकाष्ठास्थिकण्टकैरन्नसंयुतैः ।
भिद्येतान्त्रं यदा भुक्तैर्जृम्भयत्यशनेन वा ॥ ४० ॥
स्यात्पाकरसस्तेभ्याश्छिद्रेभ्यः प्रस्रवद्बहिः ।
पूरयन्गुदमन्त्रं च जनयत्युदरं ततः ॥ ४१ ॥

रेती, गवताच्या काड्या, लांकडाचीं सळपटें, हाडाचा तुकडा, किंवा कांटा वगैरे अन्नाबरोबर पोटांत गेल्यानें, अतिशय जेवल्यानें किंवा जांभयांनीं आंतडीं फाटून त्या भोंकांतून अन्नरस बाहेर पडतो आणि त्यानें गुद व आंतडीं भरून जाऊन उदर उत्पन्न होतें.

इति तदधो नाभ्याः प्रायोऽभिनिवर्तमानमुदकोदरस्य च यथाबलं च दोषाणां रूपाणि दर्शयत्यपि चातुरः स लोहितनीलपीतपिच्छिलकुणपगन्धामवर्चं उपवेशते । हिक्काश्वासकासतृष्णाप्रमेहारोचकाविपाकदौर्बल्यपरीतश्च भवति । एतच्छिद्रोदरं विद्यात् ॥ ४२ ॥

त्याचीं लक्षणें—विशेषें करून बेंबीच्या खालीं पोट वाढतें, जलोदराचीं व कुपित झालेल्या दोषांचीं त्यांच्या शक्त्यनुरूप लक्षणें होतात, लाल, निळ्या पिंवळ्या रंगाचा बुळबुळीत कच्चा मळ शौचावाटे निघतो व त्यास प्रेतासारखी घाण येते. याशिवाय उचकी, दमा, खोकला, तहान, प्रमेह, अरुचि, अपचन, व अशक्तता हे विकार होतात. यास छिद्रोदर किंवा क्षतोदर ह्मणतात.

स्नेहपीतस्य मन्दाग्नेः क्षीणस्यातिकृशस्य वा ।
अत्यम्बुपानान्नष्टेऽग्नौ मारुतः क्लोम्नि संस्थितः ॥ ४३ ॥
स्रोतःसु रुद्धमार्गेषु कफश्चोदकमूर्च्छितः ।
वर्धयेतां तदेवाम्बु स्वस्थानादुदराश्रितौ ॥ ४४ ॥

स्नेहपान करून, अग्निमंद असून, क्षीण किंवा अतिशय कृश असून फार पाणी प्यालें असतां जठराग्नि नष्ट होतो व पिपासास्थानांत वायु जाऊन बसतो. त्या योगानें उदकवाही स्रोतें बंद होऊन व आमाशयस्थ कफ पाण्याशीं मिळून ते वातकफ दोन्ही उदरांत येऊन जलाच्या स्थानांतून तेंच पाणी वाढवून उदर उत्पन्न करितात.

तस्य रूपाणि । अनन्नकांक्षापिपासागुदस्रावशूलश्वासकासदौर्बल्यान्यपि चोदरं नानावर्णराजिशिरावनततमुदकपूर्णदृतिक्षोभसंस्पर्शं भवत्येतदुदकोदरं विद्यात् ॥ ४५ ॥

त्याचीं लक्षणें—अन्नावर इच्छा नसणें, तहान, गुदस्राव व गुदशूळ, दमा, खोकला, अशक्तता, पोट चित्रविचित्र रंगाच्या रेघा व शिरांनीं आच्छादित होणें आणि पाण्यानें भरलेल्या पखाली प्रमाणें हालणें व हातास लागणें-हीं होतात. हें जलोदर होय.

तत्र अचिरोत्पन्नमनुदकप्राप्तमुदरं त्वरमाणश्चिकित्सेदुपेक्षितानां ह्येषां दोषाः स्वस्थानादपावृत्ता अपरिपाकाद्द्रवीभूताः सन्धीन् स्रोतांसि चोपक्लेदयन्ति स्वेदश्च बाह्येषु स्रोतःसु प्रतिहतगतिस्तिर्यगवतिष्ठमानस्तदेवोदकमाप्याययति ॥ ४६ ॥

तत्र पिच्छोत्पत्तौ मण्डलमुदरं गुरु स्तिमितमाकोठितमशब्दं मृदुस्पर्शमपगतराजीकमाक्रांतं नाभ्यां सर्पतीति । ततोऽनन्तरं उदकप्रादुर्भावः । तस्य रूपाणि—कुक्षेरतिमात्रवृद्धिः शिरान्तर्धानगमनमुदकपूर्णदृतिसंक्षोभस्पर्शत्वं च ॥ ४७ ॥

तदातुरमुपद्रवाः स्पृशन्ति छर्दतीसारतमकतृष्णाश्वासकासहिक्कादौर्बल्यपार्श्वशूलारुचिस्वरभेदमूत्रसङ्गादयस्तथाविधमचिकित्स्यं विद्यादिति ॥४८॥

कोणत्याही प्रकारचें उदर असो, तें नवें आहे तोंच आणि उपद्रव व पाणी होण्यापूर्वी त्याची सत्वर चिकित्सा करावी. उपेक्षा केल्यास आपापल्या स्थानापासून सुटलेले दोष स्वयं पक्व व पातळ होऊन सांधे व स्रोतें यांतही द्रव उत्पन्न करितात. पुढें बाहेरचीं स्रोतें बंद झाल्यामुळें घाम मध्येंच अडकून राहून तेंच पाणी वाढवितो. पाणी उत्पन्न होण्यापूर्वी पिच्छा ह्मणजे कफासारखा बुळबुळीत पदार्थ उत्पन्न होतो. तो उत्पन्न झाला ह्मणजे पोट वाटोळें, जड, ओलसर, स्थिर होतें, टिचकी मारली असतां वाजत नाहीं, हातास मऊ लागतें, पोटावरच्या रेघा नाहींशा होतात आणि बेंबी दाबली असतां सगळें पोट हालल्याप्रमाणें दिसतें. यानंतर पाणी होतें. पाणी झालें असतां पोट अतिशय वाढतें, शिरा दिसेनाशा

होतात, आणि पोट पाण्यानें भरलेल्या पखालीप्रमाणें हालतें व हातास लागतें. यानंतर उपद्रवास आरंभ होतो. ते उपद्रव उलटी, जुलाब, तमकश्वास, तहान, दमा, खोकला, उचकी, अशक्तता, बरगड्या दुखणें, अरुचि, आवाज फाटणें, लघ्वी बंद होणें इत्यादि होतात. हे उपद्रव झाले असतां रोगी असाध्य समजावा.

भवन्ति चात्र।

वातात्पित्तात्कफात्प्लीह्नः सन्निपातात्तथोदकात।
परस्परं कृच्छ्रतरमुदरं भिषगादिशेत ॥ ४९ ॥
पक्षाद्बद्धगुदं तूर्ध्वं सर्वं जातोदकं यथा।
प्रायो भवत्यभावाय छिद्रांत्रं चोदरं नृणाम ॥ ५० ॥
शूनाक्षं कुटिलोपस्थमुपक्लिन्नतनुत्वचम्।
बलशोणितमांसाग्निपरिक्षीणं च संत्यजेत ॥ ५१ ॥
श्वयथुः सर्वमर्मोत्थः श्वासो हिक्काऽरुचिः सतृट्।
मूर्च्छाच्छर्द्यतिसारश्च निहन्त्युदरिणं नरम् ॥ ५२ ॥
जन्मनैवोदरं सर्वं प्रायः कृच्छ्रतमं मतम्।
बलिनस्तदजाताम्बु यत्नसाध्यं नवोत्थितम ॥ ५३ ॥

वातोदरापेक्षां पित्तोदर, त्याहून कफोदर, त्याच्या पेक्षां प्लीहोदर आणि त्याहीपेक्षां सान्निपातिक उदर अधिक कष्टसाध्य आहे. बद्धगुदोदर, जलोदर व छिद्रोदर, हीं झालीं असतां मनुष्य बहुतकरून पंधरा दिवसांत मरण पावतो. ज्याचे डोळे सुजले आहेत, गुह्येन्द्रिय वांकडें झालें आहे, चामडी ओलसर-चिकट व पातळ झाली आहे आणि ज्याची शक्ति, रक्त, मांस व जठराग्नि क्षीण झालीं आहेत अशा उदर रोग्याची चिकित्सा करूं नये. ज्याचीं सर्व मर्में सुजलीं आहेत, ज्यास दमा व उचकी लागली आहे, अरुचि आहे, तृषा लागते, मूर्च्छा येते आणि उलटी व जुलाब होतात असा उदर रोगी मरण पावतो. सर्वच उदरें मूळचींच बहुधा अतिशय कष्टसाध्य आहेत. तथापि मनुष्य सशक्त असल्यास, त्यांत पाणी झालें नसल्यास, व नवीनच झालीं असल्यास, तीं श्रमानें साध्य होतात.

अशोफमरुणाभासं सशब्दं नातिभारिकम् ।
सदा गुडगुडायन्तं शिराजालगवाक्षितम् ॥ ५४ ॥
नाभिं विष्टभ्य पायौ तु वेगं कृत्वा प्रणश्याते ।
हृन्नाभिवङ्क्षणकटीगुदप्रत्येकशूलिनः ॥ ५५ ॥
कर्कशं सृजतो वातं नातिमन्दे च पावके ।
मूत्रेऽल्पे संहतविधि लालया विरसे मुखे ॥ ५६ ॥
अजातोदकमित्येतैर्लिङ्गैर्विज्ञाय तत्वतः ।
उपक्रमेद्भिषग्दोषबलकालविशेषवित ॥ ५७ ॥

ज्या रोग्याचें पोट सुजलेलें नसून अरुण वर्णाचें आहे, जें ठोकलें असतां आवाज होतो, जें फार जड लागत नाहीं, ज्यांत नेहमीं गुडगुड शब्द होत असतो, ज्यावर शिरांचें जाळें जाळीच्या खिडकीसारखें पसरलेलें असतें, बेंबी आंत ओढून धरली असतां अधोवायूचा वेग गुदद्वारापर्यंत जाऊन नाहींसा होतो, हृदय–बेंबी- जांवाडे–कंबर–व गुदद्वार यांत दुखतें, अधोवायु कर्कश शब्द करून सरतो, जठराग्नि साधारण कायम असतो, लघ्वी कमी होऊन शौचास जास्त होतें, व लाळेनें तोंड बेचव होतें, त्याच्या पोटांत पाणी झालें नाहीं असें समजून वैद्यानें दोष–बल–काल जाणून तदनुसार चिकित्सा करावी.

वातोदरे बलवतः पूर्वं स्नेहैरुपाचरेत् ।
स्निग्धाय स्वेदिताङ्गाय दद्यात्स्नेहविरेचनम् ॥ ५८ ॥
हृते दोषे परिम्लानं वेष्टयेद्वाससोदरम् ।
तथास्यानवकाशत्वाद्वायुर्नाध्मापयेत्पुनः ॥ ५९ ॥
दोषातिमात्रोपचयात्स्रोतसां सन्निरोधनात् ।
सम्भवन्त्युदराण्येवमतो नित्यं विशोधयेत् ॥ ६० ॥
शुद्धं संसृज्य च क्षीरं बलार्थं पाययेत्तु तम् ।
प्रागुत्क्लेशान्निवर्त्यं च बले लब्धे क्रमात्पयः ॥ ६१ ॥
यूषै रसैर्वा मन्दाम्ललवणै रोधितानलम् ।
सोदावर्तं पुनः स्निग्धं स्विन्नमास्थापयेन्नरम् ॥ ६२ ॥

स्फुरणाक्षेपसन्ध्यस्थिपार्श्वपृष्ठत्रिकार्तिषु ।
दीप्ताग्निं बद्धविड्वातं रूक्षमप्यनुवासयेत् ॥ ६३ ॥

सशक्त मनुष्यास वातोदर झालें असल्यास प्रथम स्नेहपान करवावें. नंतर स्वेदनक्रिया करून स्निग्ध रेचक म्हणजे एरंडेल तेल किंवा रेचक औषधें घालून तयार केलेलें तूप पाजावें. जुलाबानें दोष निघून जाऊन पोट नरम झालें म्हणजे तें कपड्यानें बांधून टाकावें. असें केल्यानें जुलाब होऊन पोटांत रिकाम्या झालेल्या जागेंत वायु शिरून तें पुन्हां फुगूं शकणार नाहीं. दोष अतिशय वाढून व त्या योगानें स्रोतांचा अवरोध होऊन उदरें उत्पन्न होतात. म्हणून उदर रोग्यास नेहमीं रेचन देत असावें. रेचनानंतर पेयादि क्रम करून शक्ति येण्याकरितां दूध पाजावें. परंतु उलटी वगैरे होण्याची पाळी येण्यापूर्वी तें बंद करावें. अग्नीचा अवरोध झाला असल्यास व वायु उलटा वर चढत असल्यास, किंचित् आंबट व लवणयुक्त कढणें किंवा मांसरस पाजून, स्नेहन व स्वेदन करून आस्थापनबस्ति द्यावा. स्फुरण, आक्षेप आणि सांधे-हाडें-बरगड्या-पाठ व माकडहाडांत वेदना होत असल्यास, व रोग्याचा अग्नि प्रदीप्त असून मल व अधोवायूचा अवष्टंभ झाला असल्यास, आणि त्याच्या शरीरांत रूक्षता असल्यास अनुवासनबस्ति द्यावा.

तीक्ष्णाधोभागयुक्तः स्यान्निरूहो दाशमूलिकः ।
वातघ्नाम्लशृतैरण्डतिलतैलानुवासनः ॥ ६४ ॥
अविरेच्यं तु यं विद्याद्दुर्बलं स्थविरं शिशुम् ।
सुकुमारं प्रकृत्याल्पदोषं वातोल्बणानिलम् ॥ ६५ ॥
तं भिषक् शमनैः सर्पिर्यूषमांसरसौदनैः ।
बस्त्यभ्यङ्गानुवासैश्च क्षीरैश्चोपाचरेद्बुधः ॥ ६६ ॥

पित्तोदरे तु बलिनं पूर्वमेव विरेचयेत ।
दुर्बलं त्वनुवास्यादौ शोधयेत क्षीरबस्तिना ॥ ६७ ॥
सजातबलकायाग्निं पुनः स्निग्धं विरेचयेत ।
पयसा सत्रिवृत्कल्केनोरुबूकशृतेन वा ॥ ६८ ॥
सातलात्रायमाणाभ्यां शृतेनारग्वधेन वा ।
सकफे वा समूत्रेण सवाते तिक्तसर्पिषा ॥ ६९ ॥
पुनः क्षीरप्रयोगं च बस्तिकर्म विरेचनम् ।
क्रमेण ध्रुवमातिष्ठन्युक्तः पित्तोदरं जयेत ॥ ७० ॥

पित्तोदरांत रोगी सशक्त असल्यास त्यास प्रथम रेचक द्यावें. आणि रोगी अशक्त असल्यास त्यांस अगोदर अनुवासनबस्ति देऊन नंतर रेचना करितां दुधाचे बस्ती द्यावे. रेचनानंतर अंगांत शक्ति येऊन अग्नि प्रदीप्त झाला ह्मणजे रोग्यास स्निग्ध करून निशोत्तराचा कल्क, किंवा एरंड्या अथवा एरंडमूळ, किंवा निवडुंग व त्रायमाण अथवा बाहव्याचा गीर यांनीं सिद्ध केलेल्या दुधाचें रेचक द्यावें. कफयुक्त पित्तोदरांत वरील कोणत्यातरी दुधांत गोमूत्र मिळवून द्यावें. आणि वातमिश्रित पित्तोदरांत तिक्तघृत मिळवून द्यावें. पित्तोदरांत प्रथम दुग्धप्रयोग, नंतर बस्ति, पुन्हां रेचन या क्रमानें वरचेवर घेऊन पित्तोदर बरें करावें.

स्निग्धं स्विन्नं विशुद्धं तु कफोदरिणमातुरम् ।
संसर्जयेत्कटुक्षारयुक्तैरन्नैः कफापहैः ॥ ७१ ॥
गोमूत्रारिष्टपानैश्च चूर्णायस्कृतिभिस्तथा ।
सक्षारैस्तैलपानैश्च शमयेत्तु कफोदरम् ॥ ७२ ॥
सन्निपातोदरे सर्वा यथोक्ताः कारयेत्क्रियाः ।
सोपद्रवं तु निर्वृत्तं प्रत्याख्येयं विजानता ॥ ७३ ॥
उदावर्तरुगानाहदाहमोहतृषाज्वरैः ।
गौरवारुचिकाठिन्यैश्चानिलादीन्यथाक्रमम् ॥ ७४
लिङ्गैः प्लीहोदरान् दृष्ट्वा रक्तं वापि स्वलक्षणैः ।
चिकित्सां संप्रकुर्वीत यथादोषं यथाबलम् ॥ ७५ ॥

स्नेहं स्वेदं विरेकं च निरूहमनुवासनम् ।
समीक्ष्य कारयेद्बाहौ वामे वा व्यधयेच्छिराम् ॥ ७६ ॥
षट्पलं वा पिबेत्सर्पिः पिप्पलीर्वा प्रयोजयेत ।
सगुडामभयां वापि क्षारारिष्टगणांस्तथा ॥ ७७ ॥

कफोदरांत प्रथम स्नेहन करून, घाम काढून, रोगी सशक्त असल्यास त्यास रेचक देऊन, रेचनानंतर जो पेयादिक्रम करावयाचा त्यांत तिखट, क्षारयुक्त व कफनाशक अशा अन्नाची योजना करावी आणि अशक्त रोगी असल्यास त्यास रेचक न देतां गोमूत्र, अरिष्टें, चूर्णं, लोहकृति व क्षारयुक्ततेल यांनीं कफोदराचें शमन करावें. सान्निपातिक उदरांत पूर्वोक्त सर्व उपचार करावे. त्यांत उपद्रव उत्पन्न झाले असल्यास तें कुशल वैद्यानें असाध्य समजून सोडून द्यावें. प्लीहोदरांत उदावर्त, शूळ व पोटफुगी, हे विकार असल्यास तें वातजन्य; दाह, मूर्च्छा, तहान व ताप असल्यास पित्तजन्य आणि जडपणा, अरुचि, व कठिणपणा असल्यास कफजन्य आणि रक्तदोषाचीं लक्षणें असल्यास रक्तविकारजन्य समजून त्याची त्या त्या दोषाच्या प्रमाणानुरूप चिकित्सा करावी. स्नेह, स्वेदन, रेचन, निरूह आणि अनुवासन बस्ति या क्रिया त्या त्या स्थित्यनुरूप कराव्या किंवा डाव्या हाताची शीर तोडावी. किंवा षट्पलघृत द्यावें अथव पिंपळीचा प्रयोग करावा. गुळाबरोबर हिरडे खावे. क्षार व अरिष्टें घ्यावीं.

पिप्पली नागरं दन्ती चित्रकं द्विगुणाभयम् ।
विडङ्गांशयुतं चूर्णमेतदुष्णाम्बुना पिबेत ॥ ७८ ॥
विडङ्गं चित्रकं शुण्ठीं सघृतां सैन्धवं वचाम्
दग्ध्वा कपाले पयसा गुल्मप्लीहापहं भवेत ॥ ७९ ॥
रोहीतकलतानां तु काण्डकाः साभया जले ।
मूत्रे वा श्रुतमेतच्च सप्तरात्रस्थितं पिबेत् ॥ ८० ॥
कामलागुल्ममेहार्शःप्लीहसर्वोदरकृमीन् ।
तद्धन्याज्जाङ्गलरसैर्जीर्णे स्याच्चात्र भोजनम् ॥ ८१ ॥
रोहीतकत्वचः कृत्वा पलानां पञ्चविंशतिम् ।
कोलद्विप्रस्थसंयुक्तं कषायमुपकल्पयेत ॥ ८२ ॥

पालिकैः पञ्चकोलैस्तु तैः सर्वैश्चापि तुल्यया ।
रोहीतकत्वचा पिष्टैर्घृतप्रस्थं विपाचयेत् ॥ ८३॥
प्लीहातिवृद्धिं शमयत्येतदाशु प्रयोजितम् ।
तथा गुल्मोदरश्वासक्रिमिपाण्डुत्वकामलाः ॥ ८४ ॥
अग्निकर्म च कुर्वीत भिषग्वातकफोल्बणे ।
पैत्तिके जीवनीयानि सर्पींषि क्षीरबस्तयः ॥ ८५ ॥
रक्तावसेकः संशुद्धिः क्षीरपानं च शस्यते ।
यूषैर्मांसरसैश्चापि दीपनीयसमायुतैः ॥ ८६ ॥
लघून्यन्नानि संसृज्य भजेत्प्लीहोदरी नरः ।

पिंपळी, सुंठ, दन्तीमूळ व चित्रक एक एक भाग; हिरडे दोन भाग, आणि बिडलोण चतुर्थांश या सर्व जिनसांचें चूर्ण ऊन पाण्याबरोबर घ्यावें. वावडिंग, चित्रक, सुंठ, सैंधव व वेखंड या जिनसा खापरांत तुपांत भाजून त्यांचें चूर्ण दुधांतून घ्यावें. हें गुल्म व प्लीहोदर यांचा नाश करितें. रक्तरोहिड्याच्या फांद्यांचीं कांडीं ठेंचून व हिरडे कुटून पाण्यांत किंवा गोमूत्रांत सात रात्री भिजत घालून ठेवावे आणि नंतर तें कुसकरून गाळून घ्यावें. हें कावीळ, गुल्म, प्रमेह, मूळव्याध, प्लीहोदर, सर्वप्रकारचीं उदरें, व कृमि यांचा नाश करितें. हें जिरल्यावर जांगल मांसाच्या शोरुव्याबरोबर जेवावें. रक्तरोहिड्याची साल १०० तोळे आणि १२८ तोळे बोरांचा गर यांचा काढा करावा. त्यांत चवक, चित्रक, पिंपळी, पिंपळीमूळ, व सुंठ हीं चार चार तोळे आणि रक्तरोहिड्याची साल ( कांहीं पाठाप्रमाणें हिरडेदळ ) २० तोळे हीं सर्व वाटून एक शेर तूप सिद्ध करावें. यापासून अतिशय वाढलेली कौल्ह, गुल्मोदर, दमा, कृमि, पांडु व कावीळ हे विकार सत्वर बरे होतात. वातकफाधिक प्लीहोदरांत अग्निकर्म ( डागणें वगैरे ) करावें. पित्ताधिकांत जीवनीय–पदार्थसिद्ध घृतें व क्षीरबस्ती द्यावे, रक्त काढवावें, रेचकें घ्यावीं आणि दूध घ्यावें. प्लीहोदरी रोग्यानें दीपक–पदार्थ–मिश्रित कढणें व मांसाचे शोरुवे यांच्या बरोबर हलकें अन्न खावें.

स्विन्नाय बद्धोदरिणे मूत्रतीक्ष्णौषधान्वितम् ॥ ८७ ॥
सतैललवणं दद्यान्निरूहं सानुवासनम् ।
परिस्रंसीनि चान्नानि तीक्ष्णं चैव विरेचनम् ॥ ८८ ॥
उदावर्तहरं कर्म कार्यं वातघ्नमेव च ।
छिद्रोदरमृते स्वेदात्श्लेष्मोदरवदाचरेत् ॥ ८९ ॥
जातं जातं जलं स्राव्यमेवं तद्यापयेद्भिषक् ।
तृष्णाकासज्वरार्तं तु क्षीणमांसाग्निभोजनम् ॥ ९० ॥
वर्जयेच्छ्वासिनं तद्वच्छूलिनं दुर्बलेन्द्रियम् ।

बद्धोदरांत प्रथम रोग्याचा घाम काढावा. नंतर अनुवासन बस्ति आणि भग गोमूत्र, निवडुंग वगैरे तीक्ष्ण औषधें, तेल आणि सैंधव यांनीं युक्त निरूहबस्ति द्यावा. त्यास सारक अन्न आणि तीक्ष्ण रेचक द्यावें. तसेंच उदावर्तनाशक व वातहारक असे सर्व उपाय करावे. छिद्रोदरांत घाम काढण्याशिवाय बाकी कफोदरावरील सर्व उपचार करावे. आणि पाणी जमलें कीं लागलेंच काढून टाकावें. या प्रमाणें करून जातील तितके दिवस रोग्याचें मरण लांबणीवर टाकावें. हा रोग साफ बरा कधीं होत नाहीं. छिद्रोदरांत तहान, खोकला, ताप, दमा, शूळ, अग्निमांद्य, क्षुधानाश, अशक्तता व कृशता हे विकार झाले असल्यास रोगी असाध्य समजून सोडून द्यावा.

अपां दोषं ग्रहण्यादौ विदध्यादुदकोदरे ॥ ९१ ॥
मूत्रयुक्तानि तीक्ष्णानि विविधक्षारवन्ति च।
दीपनीयैः कफघ्नैश्च तमाहारैरुपाचरेत् ॥ ९२ ॥
द्रवेभ्यश्चोदकादिभ्यो नियच्छेदनुपूर्वशः ।
सर्वमेवोदरं प्रायो दोषसङ्घातजं मतम् ॥ ९३ ॥
तस्मात्त्रिदोषशमनीं क्रियां सर्वेषु कारयेत् ।
दोषैः कुक्षौ हि संपूर्णे वन्हिर्मन्दत्वमृच्छति ॥ ९४ ॥
तस्माद्भोज्यानि योज्यानि दीपनानि लघूनि च ।

जलोदर व संग्रहणी वगैरे विकारांत प्रथम जलदोष काढून टाकणारीं तीक्ष्ण, गोमूत्रयुक्त आणि अनेक प्रकारचे क्षारमिश्रित औषधें द्यावीं. आणि त्यास दीपक व कफनाशक अन्न द्यावें. जलोदरांत पाणी वगैरे द्रव पदार्थ वर्ज्य

करावे. सर्व उदरें विशेषंकरून त्रिदोषजन्य असतात. ह्मणून सर्वांत त्रिदोषनाशक चिकित्सा करावी. उदर दोषांनीं भरून गेल्यामुळें अग्निमंद होतो ह्मणून उदररोग्यास दीपक व हलका आहार द्यावा.

रक्तशालीन्यवान्मुद्गाञ्जाङ्गलांश्च मृगद्विजान् ॥ ९५ ॥
पयोमूत्रासवारिष्टान्मधु शीधूंस्तथा सुराम् ।
यवागूमोदनं वापि यूषैरद्याद्रसैरपि ॥ ९६ ॥ ॥
मन्दाम्लस्नेहकटुभिर्यच्च मूलोपसाधितैः ।
औदकानूपजं मांसं शाकं पिष्टकृतं तिलान् ॥ ९७ ॥
व्यायामाध्वदिवास्वप्नं यानयानं च वर्जयेत् ।
तथोष्णलवणाम्लानि विदाहीनि गुरूणि च ॥ ९८ ॥
नाद्यादन्नानि जठरी तोयपानं च वर्जयेत् ।

सर्व प्रकारच्या उदरांत लाल साळी, जव, मूग, जांगल पशुपक्ष्यांचें मांस, दूध, गोमूत्र, अरिष्टें, मध, उंसाची दारू, मद्य, हे पदार्थ खावे. आटवल किंवा भात, पंचमूळांच्या काढ्यांत सिद्ध केलेलीं किंचित् आंबट, तिखट, स्नेह-युक्त अशीं कढणें किंवा मांसरस यांच्या बरोबर जेवावा. पाण्यांत किंवा पाणथळदेशांत होणाऱ्या प्राण्यांचें मांस, भाज्या, पिठाचे पदार्थ, तीळ, व्यायाम, मार्ग चालणें, दिवसा निजणें, घोडा किंवा गाडींतून फिरणें, उष्ण, खारट, आंबट, विदाही, जड, असें अन्न आणि पाणी पिणें या गोष्टी अगदीं वर्ज्य कराव्या.

नातिसांद्रं मतं पाने स्वादु तक्रमपेलवम् ॥ ९९ ॥
त्र्यूषणक्षारलवणैर्युक्तं तु निचयोदरी ।
वातोदरी पिबेत्तक्रं पिप्पलीलवणान्वितम् ॥ १००
शर्करामधुकोपेतं स्वादु पित्तोदरी पिबेत् ।
यमानीसैन्धवाजाजीव्योषयुक्तं कफोदरी ॥ १०१ ॥
पिबेन्मधुयुतं तक्रं व्यक्ताम्लं नातिपेलवम् ।
मधुतैलवचाशुण्ठीशताह्वाकुष्ठसैन्धवैः ॥ १०२ ॥
युक्तं प्लीहोदरी जातं सव्योषं तूदकोदरी ॥
बद्धोदरी तु हवुषायमान्यजाजीसैन्धवैः ॥ १०३ ॥
पिबेच्छिद्रोदरी तक्रं पिप्पलीक्षौद्रसंयुतम्

गौरवारोचकार्तानां समन्दाग्न्यतिसारिणाम् ॥ १०४ ॥
तक्रं वातकफार्तानाममृतत्वाय कल्पते ।

सर्व प्रकारच्या उदरांत किंचित् दाट व गोड असें ताक पिणें प्रशस्त आहे. सान्निपातिक उदरांत किंचित् दाट ताक, त्रिकटु, जवखार व सैंधव मिळवून प्यावें. वातोदरांत पिंपळी व सैंधव मिळवून प्यावें. पित्तोदरांत गोड ताक साखर व ज्येष्ठमध? मिळवून प्यावें. कफोदरांत ओंवा, सैंधव, जिरें, व मध घालून आंबट व किंचित् दाट ताक प्यावें. पानथरीवर मध, तेल, वेखंड, सुंठ, बडीशोप, कोष्ठ व सैंधव घालून प्यावें. जलोदरांत त्रिकटु घालून प्यावें. बद्धोदरांत शरणी, ओंवा, जिरें, व सैंधव घालून प्यावें. छिद्रोदरांत पिंपळी व मध घालून प्यावें. जाड्य, अरुचि, अग्निमांद्य, अतिसार आणि वातकफविकार झालेल्या रोग्यांस ताक हें अमृताप्रमाणें आहे.

शोफानाहार्तितृण्मूर्च्छापीडिते कारभं पयः ॥ १०५ ॥
शुद्धानां क्षामदेहानां गव्यं छागं समाहिषम् ।

सूज, पोटफुगी, तहान, मूर्च्छा या विकारांवर उंटिणीचें आणि शोधनानें कृश झालेल्या मनुष्यांस शक्तीकरितां गायीचें, बकरीचें अथवा म्हशीचें दूध द्यावें.

देवदारुपलाशार्कहस्तिपिप्पलिशिग्रुकैः ॥ १०६ ॥
साश्वगन्धैः सगोमूत्रैः प्रदिह्यादुदरं समैः ।
वृश्चिकालीं वचां कुष्ठं पञ्चमूलीं पुनर्नवाम् ॥ १०७ ॥
भूतीकां नागरं धान्यं जले पक्त्वावसेचयेत् ।
पलाशं कत्तृणं रास्नां तद्वत्पक्त्वावसेचयेत् ॥ १०८ ॥
मूत्राण्यष्टावुदरिणां सेके पाने च योजयेत् ।
रूक्षाणां बहुवातानां तथा संशोधनार्थिनाम् ।
दीपनीयानि सर्पींषि जठरघ्नानि वक्ष्यते ॥ १०९ ॥

देवदार, पळस, रुईचें मूळ, गजपिंपळी, शेवग्याची साल व असकंध हीं औषधें गोमूत्रांत वाटून उदरावर लेप करावा. मेढाशिंगी, वेखंड, कोष्ठ, लघुपंचमूळ,

पुनर्नवा, ओंवा, सुंठ व धणे हीं; किंवा पळस, रोहिसगवत व रास्ना, हीं औषधें पाण्यांत कढवून पोटावर धार धरावी. गाय, बकरी, मेंढी, म्हैस, घोडी, हत्तीण, उंटीण, व गाढवी यांचीं मूत्रें उदररोगांत, सेचन करण्याच्या व पिण्याच्या कामीं वापरावीं. ज्यांच्या अंगांत फार रूक्षता व वात असून ज्यांस संशोधनाची आवश्यकता आहे आहे अशा रोग्यांकरितां दीपक व उदर रोगनाशक घृतें आतां सांगतों.

> पिप्पलीपिप्पलीमूलचव्यचित्रकनागरैः ।
> सक्षारैरर्धपालैकैर्द्विप्रस्थं सर्पिषः पचेत् ॥ ११० ॥
> कल्कैर्द्विपञ्चमूलस्य तुलाधस्य रसेन च ।
> दधिमण्डाढकोपेततत्सर्पिर्जठरापहम् ।
> श्वयथुं वातविष्टम्भं गुल्मार्शांसि च नाशयेत् ॥ १११ ॥

**पञ्चकोलघृत**—पिंपळी, पिंपळीमूळ, चवक, चित्रक, सुंठ व जवखार हीं औषधें प्रत्येकीं दोन दोन तोळे, दशमुळांचा काढा २०० तोळे आणि दह्याची निवळी घालून दोन शेर तूप सिद्ध करावें. यापासून उदर, सूज, वातावष्टंभ, गुल्म व मूळव्याध हे रोग नष्ट होतात.

> नागरत्रिफलाप्रस्थं घृतं तैलात्तथाढकम् ।
> मस्तुनःसाधयित्वैतत्पिबेत्सर्वोदरापहम् ।
> कफमारुतसम्भूते गुल्मे चैतत्प्रशस्यते ११२ ॥

**नागरघृत**—सुंठ व त्रिफळा हीं एक शेर, तूप व तेल एक एक शेर आणि चार शेर मठा हीं एकत्र करून घृत सिद्ध करावें. हें सर्व प्रकारचीं उदरें आणि कफवातजन्य गुल्मांचा नाश करितें.

> चतुर्गुणे जले मूत्रे द्विगुणे चित्रकात्पले ।
> कल्के सिद्धं घृतप्रस्थं सक्षारं जठरी पिबेत ॥ ११३ ॥

चार तोळे चित्रक, दोन शेर गोमूत्र व चार शेर पाणी घालून एक शेर तूप सिद्ध करावें आणि तें जवखार घालून उदररोगांत द्यावें.

> यवकोलकुलत्थानां पञ्चमूलरसेनच ।
> सुरासौवीरकाभ्याञ्च सिद्धं वापि पिबेद्घृतम् ॥ ११४ ॥

जव, बोरांचा गर, कुळीत व बृहत्पंचमुळें यांचा काढा आणि मद्य व सौवीरक यांनीं सिद्ध केलेलें तूप प्यावें.

एभिः स्निग्धस्य सञ्जाते बले शान्तेच मारुते ।
स्रस्ते दोषाशये दद्यात्कल्पदृष्टं विरेचनम् ११५ ॥
पटोलमूलरजनीविडङ्गत्रिफलात्वचम् ।
कांपिल्यकं नीलिनींच त्रिवृतां चेति चूर्णयेत् ॥ ११६ ॥
षडाद्यान्कार्षिकानन्त्यांस्त्रींश्च द्वित्रिचतुर्गुणान् ।
कृत्वा चूर्णमतो मुष्टिं गवां मूत्रेण वा पिबेत् ।
विरिक्ते मृदु भुञ्जीत भोजनं जाङ्गलै रसैः ॥ ११७ ॥
पिण्डपेयाञ्च पीत्वा वा सव्योषं षडहं पयः ।
शृतं पिबेत्ततश्चूर्णं पिबेदेवं पुनः पुनः ॥ ११८ ॥
हन्ति सर्वोदराण्येतच्चूर्णं जातोदकान्यपि ।
कामलां पाण्डुरोगञ्च श्वयथुं चापकर्षति ॥ ११९ ॥

सदरहू घृतें पिऊन स्निग्ध झालेल्या रोग्याचा वायु शमन होऊन अंगांत शक्ति आली आणि दोषाशय शिथिल झाला ह्मणजे तो काढून टाकण्याकरितां कल्पस्थानांत सांगितलेल्यापैकीं यथोचित रेचक द्यावें.

**पटोलादिचूर्ण**—कडू पडवळीचें मूळ, हळद, वावडिंग, आणि हिरडेदळ, बेहडेदळ व आंवळे प्रत्येकीं एक एक तोळा, कपिला दोन तोळे, निळीचें मूळ तीन तोळे व निशोत्तर चार तोळे या सर्वांचें चूर्ण करून दरवेळीं चार तोळे चूर्ण गोमूत्रांतून प्यावें. यापासून जुलाब झाले ह्मणजे जांगल मांसांच्या शोरुव्या बरोबर हलका आहार करावा. पेज किंवा कण्हेरी पिऊन, त्रिकटुचूर्ण घालून कढविलेलें दूध प्यावें आणि वर सदरहू चूर्ण खावें. याच क्रमानें वरचेवर चूर्ण खावें. या चूर्णापासून पाणी झालेल्यासुद्धां सर्व प्रकारचीं उदरें, कावीळ, पाण्डुरोग व सूज हे रोग नाहींसे होतात.

गवाक्षीं शंखिनीं दन्तीं तिल्वकस्य त्वचं वचाम् ।
पिबेद्द्राक्षाम्बुगोमूत्रकोलकर्कन्धुशीधुभिः ॥ १२० ॥

इन्द्रायणमूळ, शंखवेल, दन्तीमूळ, लोध्राची साल, व वेखंड हीं औषधें द्राक्षांचा काढा, गोमूत्र, लहान किंवा मोठ्या बोरांचा काढा व उंसाची दारू यांच्या बरोबर प्यावीं.

यमानी हवुषा धान्यं त्रिफला चोपकुञ्चिका ।
कारवी पिप्पलीमूलमजगन्धा शटी वचा ॥ १२१ ॥
शताह्वा जीरकं व्योषं स्वर्णक्षीरी सचित्रका ।
द्वौ क्षारौ पौष्करं मूलं कुष्ठं लवणपञ्चकम् ॥ १२२ ॥
विडङ्गस्य समांशानि दन्त्या भागास्त्रयस्तथा ।
त्रिवृद्विशालयोर्द्वौ द्वौ सातला स्याच्चतुर्गुणा ॥ १२३ ॥
एतन्नारायणं नाम चूर्णं रोगगणापहम् ।
नैतत्प्राप्यातिवर्तन्ते रोगा विष्णुमिवासुराः ॥ १२४ ॥
तक्रेणोदरिभिः पेयं गुल्मिभिर्बदराम्बुना ।
आनद्धवाते सुरया वातरोगे प्रसन्नया ॥ १२५ ॥
दधिमण्डेन विट्सङ्गे दाडिमाम्बुभिरर्शसैः ।
परिकर्ते सवृक्षाम्लमुष्णाम्बुभिरजीर्णके ॥ १२६ ॥
भगन्दरे पाण्डुरोगे श्वासे कासे गलग्रहे ।
हृद्रोगे ग्रहणीदोषे कुष्ठे मन्देनले ज्वरे ॥ १२७ ॥
दंष्ट्राविषे मूलविषे सगरे कृत्रिमे विषे ।
यथार्हं स्निग्धकोष्ठेन पेयमेतद्विरेचनम् ॥ १२८ ॥

**नारायणचूर्ण**—ओंवा, शेरणी, धणे, त्रिफळा, कलोंजी जिरें, काळें जिरें, पिंपळीमूळ, रान तुळस, कचोरा, वेखंड, बडीशोप, जिरें, त्रिकटु, पिंवळा धोतरा किंवा पिसोळा, चित्रक, यवखार, सज्जीखार, पुष्करमूळ, कोष्ठ, सैंधव, बिडलोण, पादेलोण, काचलवण, समुद्राचें मीठ, व वावडिंग हीं समभाग, दंतीमूळ तीन भाग, निशोत्तर व कडू इंद्रायणाचें मूळ दोन दोन भाग, आणि शिकेकाईचीं मुळें चार भाग घेऊन या सर्वांचें चूर्ण करावें. यास नारायण चूर्ण ह्मणतात. हें अनेक रोगांचा नाश करितें. दैत्य ज्याप्रमाणें विष्णूच्या तडाक्यांतून सुटून जाऊं शकत नाहींत त्याप्रमाणें रोग या चूर्णाच्या तावडींत सांपडले असतां सुटून जाऊं शकत नाहींत. उदर रोग्यांनीं हें ताकाबरोबर घ्यावें. गुल्म रोग्यांनीं बोरांच्या काढ्यांतून, पोटांत वारा धरला असतां मद्याबरोबर, वातरोगावर मद्याच्या निवळीबरोबर, मलावरोधावर दह्यांच्या निवळीबरोबर, मूळव्याधीवर डाळिंबाच्या रसांतून, पोटांत कातरल्या प्रमाणें पीडा होत असल्यास आमसोलाच्या सारांतून आणि अजीर्णावर ऊनपा-

ण्याबरोबर प्यावें. याशिवाय भगंदर, पांडुरोग, दमा, खोकला, गलग्रह, हृद्रोग, संग्रहणी, कुष्ठ, अग्निमांद्य, ताप, सर्प वगैऱ्यांचें विष, बचनाग वगैरे उद्भिज्जविष, दूषीविष व कृत्रिमविष या विकारांवरही प्रथम रोग्याचा कोठा स्निग्ध करून त्या त्या विकारास उचित अशा अनुपानानें हें रेचक चूर्ण द्यावें.

हवुषा काञ्चनक्षीरी त्रिफला कटुरोहिणी।
नीलिनी त्रायमाणा च शातला त्रिवृता वचा ॥ १२९ ॥
सैन्धवं काललवणं पिप्पली चेति चूर्णयेत्।
दाडिमत्रिफलामांसरसमूत्रै सुखोदकैः ॥ १३० ॥
पेयोऽयं सर्वगुल्मेषु प्लीह्नि सर्वोदरेषु च।
कुष्ठे श्वित्रे सरुजके सवाते विषमाग्निषु ॥ १३१ ॥
शोथार्शः पाण्डुरोगेषु कामलासु हलीमके।
वातं पित्तं कफञ्चाशु विरेकात्सम्प्रसाधयेत ॥ १३२ ॥

**हवुषादिचूर्ण**—खडशेरणी, पिसोळा, त्रिफळा, कुटकी, निळीचें मूळ किंवा बी, त्रायमाण, शिकेकाई, निशोत्तर, वेखंड, सैंधव, काळें मीठ व पिंपळी यांचें चूर्ण करावें आणि तें डाळिंबाचा किंवा त्रिफळ्याचा काढा, मांसरस, गोमूत्र अथवा कोमट पाण्याबरोबर खावें. हें सर्व प्रकारचे गुल्म, पानथरी, सर्व प्रकारचीं उदरें, कुष्ठ, पांढरें कोड, शूळ, वातरोग, विषमाग्नि, सूज, मूळव्याध, पांडुरोग, कावीळ, हलीमक श्वास आणि वात, पित्त, कफविकार या सर्वांस रेचनद्वारा सत्वर काढून टाकितें.

नीलिनीं निचुलं व्योषं द्वौ क्षारौ लवणानि च।
चित्रकञ्च पिबेच्चूर्णं सर्पिषोदरगुल्मनुत ॥ १३३ ॥

**नीलिन्यादि चूर्ण**—निळीचें मूळ, समुद्रफळ, त्रिकटु, जवखार, सज्जीखार, वर सांगितलेलीं पांच प्रकारचीं मिठें व चित्रक यांचें चूर्ण करून तें तुपाबरोबर सेवन करावें. हें उदर व गुल्माचा नाश करितें.

क्षीरद्रोणं सुधाक्षीरप्रस्थार्धसहितं दधि।
जातं विमथ्य तद्युक्तया त्रिवृत्सिद्धं पिबेद्घृतम् ॥ १३४ ॥
तथा सिद्धं घृतप्रस्थं पयस्यष्टगुणे पिबेत।

स्नुक्क्षीरपलकल्केन त्रिवृता षट्पलेन च ।
गुल्मानां गरदोषाणामुदराणाञ्च शान्तये ॥ १३५ ॥

स्नुहीक्षीरघृत–३२ शेर दुधांत एकशेर तिधारी निवडुंगाचा चीक घालून तें विरजावें. त्याचें दही घुसळून त्यापासून तूप काढून तें निशोत्तराचा कल्क घालून सिद्ध करावें व प्यावें. अशाच तऱ्हेनें तिधारी निवडुंगाचा चीक ४ तोळे, निशोत्तराचा कल्क २४ तोळे आणि आठपट दूध घालून तूप सिद्ध करून प्यावें. यापासून गुल्म, दूषी विषाचे विकार व उदरें बरीं होतात.

दधिमण्डाढके सिद्धात्स्नुक्क्षीरपलकल्कितात् ।
घृतप्रस्थात्पिबेन्मात्रां तद्वज्जठरशान्तये ॥ १३६ ॥
एषां चानुपिबेत्पेयां पयो वा स्वादु वा रसम् ।
घृते जीर्णे विरिक्तं तु कोष्णनागरकैः शृतम् ॥ १३७ ॥
शुण्ठ्या पिबेत्ततः पेयां यूषं कौलत्थकं ततः ।
पिबेद्रूक्षस्त्र्यहं त्वेवं पयो वा प्रतिभोजितः १३८ ॥
पुनः पुनः पिबेत्सर्पिरानुपूर्व्या तयैव च ।
घृतान्येतानि सिद्धानि विदध्यात्कुशलो भिषक् ॥ १३९ ॥
गुल्मानां गरदोषाणामुदराणाञ्च शान्तये ।
पीलुकल्कोपसिद्धं वा घृतमानाहभेदनम् ॥ १४० ॥
गुल्मघ्ननीलिनी सर्पिःस्नेहं वा मिश्रकं पिबेत् ।
क्रमान्निर्हृतदोषाणां जाङ्गलप्रतिभोजिनाम् ॥ १४१ ॥
दोषशेषनिवृत्त्यर्थं योगान्वक्षाम्यतः परम् ।

दह्यांची निवळ ८ शेर आणि तिधारी निवडुंगाचें दूध चार तोळे घालून एक शेर तूप सिद्ध करावें व त्यांतून दरवेळीं योग्य मात्रा घ्यावी. यापासून उदरें बरीं होतात. या घृतांवर कण्हेरी, साखर घातलेलें दूध किंवा मांसरस प्यावा. तूप पचन होऊन जुलाब झाले ह्मणजे सुंठ घालून कढविलेलें कोमट दूध प्यावें. नंतर सुंठ घालून केलेली कण्हेरी किंवा कुळथांचें कढणही प्यावें. याप्रमाणें तीन दिवसपर्यंत रूक्ष राहून तूप प्यावें किंवा मध्यें थोडें भोजन करून वरील क्रमानें पुनः पुनः तूप प्यावें. कुशल वैद्यानें हीं घृतें यथाविधि उत्तमरीतीनें तयार करून दिलीं

असतां गुल्म, गरदोष व उदरें बरीं होतात. पीलुचा कल्क घालून सिद्ध केलेल्या तुपानें रेचन होऊन उदरांतील पोटफुगी वाहींशी होते. गुल्म चिकित्सेंत सांगितलेलें नीलिनीघृत किंवा मिश्रक स्नेह यांचाही उदरांत उपयोग करावा. वरील उपायांनीं क्रमशः दोष निघून जाऊन त्यावर जांगल मांसाच्या शोरव्याबरोबर भोजन केल्यावरही जर दोष शिल्लक राहिला तर तो काढून टाकण्याकरितां पुढील उपाय योजावे.

चित्रकामरदारुभ्यां कल्कं क्षीरेण ना पिबेत् ॥ १४२ ॥
मासंयुक्तं तथा हस्तिपिप्पलीविश्वभेषजम् ।
विडङ्गं चित्रकं दन्तीचव्यं व्योषं च तैः समैः ॥ १४३ ॥
कल्कैः कोलसमैः पीत्वा प्रवृद्धमुदरं जयेत् ।
पिबेत्कषायं त्रिफलादन्तीरोहीतकैः शृतम् ॥ १४४ ॥
व्योषक्षारयुतं जीर्णं रसैरद्यात्सजाङ्गलम् ।
मासं वा भोजनं भोज्यं सुधाक्षीरघृतान्वितम् ॥ १४५ ॥
क्षीरानुपानं गोमूत्रेणाभयां वा प्रयोजयेत् ।
सप्ताहं माहिषं मूत्रं क्षीरं चानन्नभुक्पिबेत ॥ १४६ ॥
मासमौष्ट्रं पयश्छागं त्रीन्मासान्व्योषसंयुतम् ।
हरीतकीसहस्रं वा क्षीराशी वा शिलाजतु ॥ १४७ ॥
शिलाजतुविधानेन गुग्गुलुं वा प्रयोजयेत् ।
शृङ्गवेरार्द्रकरसः पाने क्षीरसमो मतः ॥ १४८ ॥
तैलं रसेन तेनैव सिद्धं दशगुणेन वा ।
दन्तीद्रवन्तीफलजं तैलं दूष्योदरे हितम् ॥ १४९ ॥
शूलानाहविबन्धेषु सक्तुयूषरसादिभिः ।
सरलामरशिग्रूणां बीजेभ्यो मूलकस्य च ॥ १५० ॥
तैलान्यभ्यङ्गपानार्थे शूलघ्नान्यनिलोदरे ।

चित्रक व देवदाराचा कल्क दुधांतून द्यावा. गजपिंपळी, सुंठ, वावडिंग, चित्रक, दंतीमूळ, चवक व त्रिकटु या सर्व समभाग औषधांचा १।१ तोळा कल्क दुधांतून सतत महिनाभर प्याल्यानें कितीही वाढलेलें उदर असलें तरी तें बरें होतें. त्रिफळा, दन्तीमूळ व रक्तरोहिडा यांच्या काढ्यांत जवखार टाकून तो जिरल्यावर

जांगलमांसाच्या शोरुव्याबरोबर भात जेवावा. किंवा वरील स्नुहीक्षीरसिद्ध तुपाबरोबर एक महिनाभर जेवावें. गोमूत्रांतून हिरड्यांचें चूर्ण घेऊन वर दूध प्यावें किंवा सात दिवस पर्यंत अन्न अगदींच वर्ज्य करून हशीचें मूत प्यावें. व जेवणाच्या ऐवजीं हशीचेंच दूध प्यावें. अथवा महिनाभर उंटणीचें किंवा तीन महिनेपर्यंत बकरीचें दूध त्रिकटुचूर्ण मिळवून प्यावें. किंवा अन्न न खातां फक्त दुधावर राहून चढ उताराच्या पद्धतीनें एक हजार हिरडे खावे, किंवा पूर्वी सांगितल्याप्रमाणें शिलाजतुप्रयोग करावा. शिलाजिताप्रमाणेंच गुग्गुळाचें सेवन करावें. समभाग आल्याचा रस घालून दूध प्यावें, किंवा दसपट रस घालून तयार केलेल्या तेलाचा उपयोग करावा, दन्ती व द्रवंतीच्या फळांचें तेल दूष्योदरांत हितकर आहे. तें शूळ, पोटफुगी, व वातावष्टंभ यांवर सातू, कढण व रसांतून द्यावें. वातोदरांत शूळ बंद करण्याकरितां सरळ देवदार, आणि शेवग्याच्या व मुळ्याच्या शेंगांतील बियांचें तेल चोळण्यास व पिण्यास द्यावें.

स्तैमित्यारुचिहृल्लासेम्वल्पाग्निर्मद्यपस्तथा ॥ १५१ ॥
अरिष्टान्वा पिबेत्क्षारान्कफस्त्यानास्थितोदरः ।
पिप्पलीं तिल्वकं हिंगुनागरं हस्तिपिप्पलीम् ॥ १५२ ॥
भल्लातकं शिग्रुफलं त्रिफलां कटुरोहिणीम् ।
देवदारु हरिद्रे द्वे सरलातिविषे वचाम् ॥ १५३ ॥
कुष्ठं मुस्तं तथा पञ्च लवणानि प्रकल्पच ।
दधिसर्पिर्वसातैलमज्जयुक्तानि दाहयेत् ॥ १५४ ॥
अन्तर्धूमततः क्षाराद्विडालकपदं पिबेत् ।
मदिरादधिमण्डोष्णजलारिष्टसुरासवैः ॥ १५५ ॥
हृद्रोगं श्वयथुं गुल्मं प्लीहार्शोजठराणिच ।
विषूचिकामुदावर्तं वाताष्ठीलाञ्च नाशयेत् ॥ १५६ ॥

कफानें ज्याचें पोट ताठलेलें, निश्चल व ओलसर आहे, ज्यास अरुचि व मळमळ आहे, ज्याचा अग्नि मंद आहे, व जो दारू पिणारा आहे अशा रोग्यास अरिष्टें व क्षार द्यावे. पिंपळी, लोध्र, हिंग, सुंठ, गजपिंपळी, बिबा, शेगटाच्या शेंगा, त्रिफळा, कुटकी, देवदार, हळद, दारुहळद, सरळ, अतिविष, वेखंड,

कोष्ठ, नागरमोथा, आणि पांच प्रकारचीं मिठें हीं सर्व औषधें दहीं, तूप, वसा, तेल व मज्जा यांत मिळवून एका मडक्यांत भरून त्याचें तोंड बंद करून आंतल्या आंत अन्तर्धूमानें जाळून राख करावी, यांतून दोन तोळे राख जेवणानंतर मद्य, दह्यांची निवळ, ऊन पाणी, अरिष्ट किंवा मद्यास व यांतून घ्यावी. ही हृद्रोग, सूज, गुल्म, पानथरी, मूळव्याध, उदरें, पटकी, पोटफुगी, वाताष्ठीला यांचा नाश करिते.

क्षारं चाजकरीषाणां स्त्रुतं मूत्रैर्विपाचयेत् ।
कार्षिकं पिप्पलीमूलं पञ्चैवं लवणानि च ॥ १५७ ॥
पिप्पलीं चित्रकं शुण्ठीं त्रिफलां त्रिवृतां वचाम् ।
द्वौ क्षारौ शातलां दन्तीं स्वर्णक्षीरीं विषाणिकाम् ॥ १५८ ॥
कोलप्रमाणां वटिकां पिबेत्सौवीरसंयुताम् ।
श्वयथावविपाके च प्रवृद्धे चोदकोदरे ॥ १५९ ॥
भावितानां गवां मूत्रे षष्टिकानां तु तण्डुलैः ।
यवागूं पयसा सिद्धां प्रकामं भोजयेन्नरम् ॥ १६० ॥
पिबेदिक्षुरसं चानु जठराणां निवृत्तये ।
स्वं स्वं स्थानं व्रजन्त्येषां तथा पित्तकफानिलाः ॥ १६१ ॥

शेळीच्या लेंड्यांचा क्षार गोमूत्रांत विरवून अग्नीवर ठेवावा. तो दाट होऊं लागला ह्मणजे त्यांत पिंपळीमूळ, पंचलवणें, पिंपळी, चित्रक, सुंठ, त्रिफळा, निशोत्तर, वेखंड, जवखार, शिकेकाईचें मूळ, दन्तीमूळ, पिमोळा व मेढशिंगी, या सर्वांचें एक एक तोळा चूर्ण घेऊन त्याच्या बोरा एवढ्या गोळ्या कराव्या आणि त्या सौवीरांत कालवून प्याव्या. ह्मणजे सूज, अपचन, व वाढललें जलोदर हीं नाहींशीं होतात. साठेसाळीच्या तांदुळांस गोमूत्रांची पुटें देऊन त्यांची दुधांत केलेली कण्हेरी यथेच्छ पाजावी आणि त्यावर उंसाचा रस पाजावा. या योगानें उन्मार्गगामी वात–पित्त–कफ आपापल्या स्थानीं येऊन उदर बरें होतें.

शङ्खिनीस्नुक्त्रिवृद्दन्तीचिरिबिल्वादिपल्लवैः ।
शाकं गाढपुरीषाय प्राग्भक्तं दापयेद्भिषक् ॥ १६२ ॥

ततोऽस्मै शिथिलीभूतवर्चोदोषाय शास्त्रवित् ।
दद्यान्मूत्रयुतं क्षीरं दोषशेषहरं शिवम् ॥ १६३ ॥
पार्श्वशूलमुपस्तम्भं हृद्ग्रहं चापि मारुतम् ।
जनयेद्यस्य तैलं स बिल्वक्षारेण ना पिबेत् ॥ १६४ ॥
तथाग्निमन्थस्योनाकपलाशतिलनालजैः ।
बलाकदल्यपामार्गक्षारैः प्रत्येकशः स्रुतैः ॥ १६५ ॥
तैलं पक्त्वा भिषग्दद्यादुदराणां प्रशान्तये ।
निवर्तते चोदरिणां हृद्ग्रहश्चानिलोद्भवः ॥ १६६ ॥
" कफे वातेन पित्ते वा ताभ्यां वाप्यावृतेऽनिले ।
बलिनः स्वौषधयुतं तैलमैरण्डजं हितम् ॥ १६७ ॥

ज्याचा मळाचा खडा झाला असेल त्यास सांखवेल, तिधारी निवडुंग, निशोत्तर, दन्ती, घाणेराकरंज वगैऱ्यांच्या कोंवळ्या पाल्यांची भाजी जेवणापूर्वी द्यावी. या योगानें मल व दोष शिथिल झाले ह्मणजे शिल्लक राहिलेला दोष काढून टाकण्याकरितां गोमूत्रांतून दूध द्यावें. वायूच्या जोरानें जर उदर रोग्याच्या बरगड्यांत दुखत असेल, स्नायु वगैरे ताठरले असतील, छातींत धडा बसला असेल तर बेल फळ व जवखार घालून सिद्ध केलेलें तेल प्यावें. किंवा ऐरण, टेंटू, पळस, तिळांचे दांडे, चिकणा, केळ व आघाडा यांच्या निरनिराळ्या क्षारांनीं सिद्ध केलेलें तेल प्यावें. यांच्या योगानें उदर बरें होऊन वायूनें बसलेला छातींतील बांधही मोकळा होतो. वातानें कफ किंवा पित्त आच्छादित झालें असल्यास किंवा कफपित्तानें वायु आवृत झाला असल्यास आणि रोगी सशक्त असल्यास त्या त्या दोषानुरूप औषधें मिळवून एरंडेल तेल प्यावें.

सुविरिक्तो नरो यस्तु पुनराध्मततां व्रजेत् ।
सुस्निग्धैरम्ललवणैर्निरूहैः समुपाचरेत् ॥ १६८ ॥
सोपस्तम्भोऽपि वा वायुराध्मापयति यं नरम् ।
तीक्ष्णैः सक्षारगोमूत्रैर्बस्तिभिस्तमुपाचरेत् ॥ १६९ ॥
क्रियातीते त्रिदोषे च जठरे चापशाम्यति ।
ज्ञातीन्ससुहृदो दारान्ब्राह्मणान्नृपतीन्गुरून् ॥ १७० ॥
अनुज्ञाप्य भिषक्कर्म विदध्यात्संशयं ब्रुवन् ।

अक्रियायां ध्रुवो मृत्युः क्रियायां संशयो भवेत् ॥ १७१ ॥
एवमाख्याय तस्येदमनुज्ञातः प्रयोजयेत् ।
पानभोजनसंयुक्तं विषमस्मै प्रदापयेत् ॥ १७२ ॥
यस्मिन्वा कुपितः सर्पो विसृजेद्धिफले विषम् ।
तेनास्य दोषसङ्घातः स्थिरो लीनो विमार्गगः ॥ १७३ ॥
विषेणाशु प्रमाथित्वादाशु भिन्नः प्रवर्तते ।
विषेण हृतदोषं तं शीताम्बुपरिषेचितम् ॥ १७४ ॥
पाययेत भिषग्दुग्धं यवागूं वा यथाबलम् ।
त्रिवृन्मण्डूकपर्ण्योश्च शाकं सैंधववास्तुकम् ॥ १७५ ॥
भक्षयेत्कालशाकं वा स्वरसोदकसाधितम् ।
निरम्लवणस्नेहं स्विन्नास्विन्नमनन्नभुक् ॥ १७६ ॥
मासमेकं ततश्चैव तृषितः स्वरसं पिबेत्
एवं विनिर्हृते दोषं शाकैर्मासात्परं ततः ॥ १७७ ॥
दुर्बलाय प्रयुञ्जीत प्राणभृत्काप्परमं पयः

चांगले जुलाब झाले असूनही ज्याचें पोट पुनः फुगतें त्यास बरेचसे स्निग्ध आंबट व खारट बस्ति द्यावे. कफादिकांनीं आच्छादित झाल्यामुळें जर वायु पुनः पोट फुगवीत असेल तर जवखार व गोमूत्रमिश्रित तीक्ष्ण बस्ति द्यावे. त्रिदोषजन्य उदरांत सर्व प्रकारचे उपाय करूनही जर गुण आला नाहीं तर वैद्यानें रोग्याचे ज्ञातिबांधव, मित्र, बायको, शिष्ट ब्राह्मण, राजा व गुरू यांस सांगावें कीं मीं आपल्याकडून औषधोपचाराची शिकस्त केली, परंतु गुण आला नाहीं. आतां यास एकच शेवटचा उपाय उरलेला आहे. तो केला तर रोगी कदाचित् वांचण्याचा संभव आहे. परंतु जगेलच अशी खात्री नाहीं. मात्र हा उपाय न केल्यास रोगी निस्संशय मरणार आहे. तो उपाय सर्पाचें विष देणें हा होय. जर सर्वांची सम्मति पडली तर खाण्यापिण्याच्या पदार्थांतून सर्पाचें विष द्यावें. अगर क्रोधानें ज्या एखाद्या फळावर सर्पानें विष टाकलें असेल तें फळ खावयास द्यावें. हें विष जाज्वल्य व सत्वर क्रिया करणारें असल्यामुळें त्याच्या योगानें स्तब्ध होऊन स्रोतोमार्गांत भिनून बसलेला व उन्मार्गगामी झालेला दोषसमूह मोकळा व पातळ होऊन वाहूं लागतो. या प्रमाणें दोष निघून गेल्यावर रोग्यास थंड पाण्याचें सिंचन करून त्याच्या शक्तीच्या मानानें दूध किंवा कण्हेरी पाजावी. किंवा निशो-

तर, मण्डूकपर्णी, जव, चाकवत, किंवा कालशाक यांच्या भाज्या त्यांच्याच अंगरसांत आंबटाण, मीठ, तेल-तूप न घालतां शिजवून खाव्या. त्या वाटल्यास वाफवाव्या किंवा न वाफविल्या तरी चालेल. एक महिनापर्यंत अन्न न खातां नुस्त्या या भाज्या खाऊन असावें. तहान लागल्यास याच भाज्यांचा अंगरस घ्यावा. याप्रमाणें महिनाभर वरील भाज्या खाऊन सर्व दोष निघून गेले ह्मणजे अशक्त झालेल्या रोग्यास शक्ति येण्याकरितां हत्तिणीचें दूध पाजीत जावें.

इदं तु शल्यहर्तॄणां कर्म स्याद्दृष्टकर्मणाम् ॥ १७८ ॥
वामं कुक्षिं मापयित्वा नाभ्यधश्चतुरङ्गुलम् ।
मात्रायुक्तेन शस्त्रेण पाटयेन्मतिमान् भिषक् ॥ १७९ ॥
विपाट्यान्त्रं ततःपश्चाद्वीक्ष्य बध्दक्षतान्त्रयोः ।
सर्पिषाभ्यज्य केशादीनवमृज्य विमोक्षयेत् ॥ १८० ॥
मूर्च्छनाद्यच्च सम्मूढमन्त्रं तच्च विमोक्षयेत् ।
छिद्राण्यन्त्रस्य तु स्थूलैर्दंशयित्वा पिपीलिकैः ॥ १८१ ॥
बहुशः सङ्गृहीतानि ज्ञात्वा छित्वा पिपीलिकान् ।
प्रतियोगैः प्रवेश्यान्त्रं प्रैषैः सीव्येद्व्रणं ततः ॥ १८२ ॥
तथा जातोदकं सर्वमुदरं व्यधयेद्भिषक् ।
वामपार्श्वे त्वधो नाभेर्नाडीं दत्वा च गालयेत् ॥ १८३ ॥
निःस्राव्य च विमृज्येत वेष्टयेद्वाससोदरम् ।
तथा बस्तिविरेकाद्यैर्म्लानं सर्वञ्च वेष्टयेत् ॥ १८४ ॥
निःसृते लङ्घितः पेयामस्नेहलवणां पिबेत् ।
अतः परञ्च षण्मासान् क्षीरवृत्तिर्भवेन्नरः ॥ १८५ ॥
त्रीन्मासान्पयसा पेयां पिबेत्त्रींश्चापि भोजयेत् ।
श्यामाकं कोरदूष्यं वा क्षीरेण लघुभोजनः ॥ १८६ ॥
नरः संवत्सरेणैवं जयेत्प्राप्तं जलोदरम् ।

**प्रयोगाणाञ्च सर्वेषामनुक्षीरं प्रयोजयेत् ॥ १८७ ॥**

**दोषानुबन्धरक्षार्थं बलस्थैर्यार्थमेव च ।**

**प्रयोगापचिताङ्गानां हितं त्युदरिणां पयः**

**सर्वधातुक्षयार्तानां देवानाममृतं यथा ॥ १८८ ॥**

आतां बद्धोदर व छिद्रोदर यांवरची शस्त्रक्रिया सांगतों. ती अनुभवी शस्त्रवैद्यानेंच करावी. बेंबीच्या खालीं डाव्या बाजूनें चार बोटें जागा सोडून चारच बोटें जागा चिरावी. नंतर त्या छिद्रांतून आंतडीं बाहेर काढून बद्धोदर आहे किंवा छिद्रोदर आहे हें पाहून बद्धोदर असल्यास त्यांत चिकटून बसलेले केंस, मळ, वगैरे दार्थ काढून टाकून तूप चोपडावें. छिद्रोदर असल्यास, त्यांचें शोधन करून आंतड्यांच्या छिद्रांवर मोठ्या मुंगाळ्यां कडून किंवा डोंगळ्यांकडून दंश करवावा. त्यायोगानें तीं सुजल्या सारखीं होऊन त्यांचीं तोंडें एकवटतील. नंतर आंतडीं आंत जागच्याजागीं बसवून बाहेरचा व्रण शिवून टाकावा. याच प्रमाणें वैद्यानें जलोदराचें ही वेधन करावें. त्यांत बेंबीच्या खालीं डाव्या बाजूस छिद्र करून त्यांतून नळी लावून पाणी काढावें. पाणी काढून झालें ह्मणजे छिद्रावर तूप चोपडून पोटावर कपड्याचा पट्टा बांधावा. याचप्रमाणें बस्ति, विरेचन वगैऱ्यांच्या योगानें पोट रिकामें झालें असतांही त्यावर पट्टा बांधावा. पाणी काढल्या नंतर लंघन करवून तूप व मिठावांचून पेया पाजावी. यानंतर सतत सहा महिनेपर्यंत दुधावर रहावें. पुढें तीन महिनेपर्यंत दुधाबरोबर पेया घ्यावी आणि त्यानंतर तीन महिनेपर्यंत सांवे व हरीक यांचा भात दुधाबरोबर जेवावा. याप्रमाणें एक वर्षपर्यंत लघुभोजन करून जलोदर बरें करावें. सर्वप्रयोगांवर दुधाचें अनुपान ठेवावें. त्यायोगानें इतर दोषांचा संसर्ग बाधत नाहीं आणि रोग्याच्या अंगांत शक्ति व दृढता कायम राहते. देवांस जसें अमृत तसें अनेक प्रकारच्या चिकित्साप्रयोगांनीं कृश झालेल्या व सर्व धातूंचा क्षय झालेल्या उदर रोग्यास दूध हें हितकर आहे. तत्र श्लोकौ

**हेतुं प्राग्रूपमष्टानां लिङ्गं व्यासमासतः ।**

**उपद्रवान्गरीयस्त्वं साध्यासाध्यत्वमेव च ॥ १८९ ॥**

जाताजाताम्बुलिङ्गानि चिकित्सां चोक्तवानृषिः ।
समासव्यासनिर्देशैरुदराणां चिकित्सितम् ॥ १९० ॥

या उदरचिकित्साध्यायांत आत्रेय महर्षींनीं आठप्रकारच्या उदरांचीं कारणें, पूर्वरूप, लक्षणें, उपद्रव, गौरवलाघव, साध्यासाध्य विचार, पोटांत पाणी उत्पन्न झालेल्या व न झालेल्या उदराचीं लक्षणें आणि सर्वांची चिकित्सा इतके विषय संक्षिप्त व विस्तृत दोन्ही प्रकारांनीं वर्णन केले आहेत.

अठरावा अध्याय समाप्त.

## अध्याय एकोणिसावा.

अथातो ग्रहणीचिकित्सितं व्याख्यास्यामः ।
इति ह स्माह भगवानात्रेयः

आता ग्रहणीचिकित्सेचा अध्याय सांगतों. आत्रेय ऋषि असेंच सांगते झाले.

आयुर्वर्णोबलं स्वास्थ्यमुत्साहोपचयौ प्रभा ।
ओजस्तेजोऽग्नयः प्राणाश्चोक्ता देहाग्निहेतुकाः ॥ १ ॥
शान्तेऽग्नौ म्रियते युक्ते चिरञ्जीवत्यनामयः ।
रोगी स्याद्विकृते मूलमग्निस्तस्मान्निरुच्यते ॥ २ ॥
यदन्नं देहधात्वोजोबलवर्णादिपोषकम् ।
तत्राग्निर्हेतुराहारान्नत्यपक्वाद्रसादयः ॥ ३ ॥
अन्नमादानकर्मा तु प्राणः कोष्ठं प्रकर्षति ।
तद्द्रवैर्भिन्नसङ्घातं स्नेहेन मृदुतां गतम् ॥ ४ ॥
समानेनावधूतोऽग्निरुदर्यः पवनेन तु ।
काले भुक्तं समं सम्यक्पचत्यायुर्विवृद्धये ॥ ५ ॥
एवं रसमलायान्नमाशयस्थमवस्थितः ।
पचत्यग्निर्यथा स्थाल्यामोदनायाम्बुतण्डुलम् ॥ ६ ॥

अन्नस्य भुक्तमात्रस्य षड्रसस्य प्रपाकतः ।
मधुरात्प्राक्कफोद्भावात्फेनभूत उदीर्यते ॥ ७ ॥
परन्तु पच्यमानस्य विदग्धस्याम्लभावतः ।
आशयाच्च्यवमानस्य पित्तमच्छमुदीर्यते ॥ ८ ॥
पक्वाशयन्तु प्राप्तस्य शोष्यमाणस्य वन्हिना ।
परिपिण्डितपक्वस्य वायुः स्यात्कटुभावतः ॥ ९ ॥
अन्नमिष्टं ह्युपकृतमिष्टैर्गन्धादिभिः पृथक् ।
देहे प्रीणाति गन्धादीन्घ्राणादीनीन्द्रियाणि च ॥ १० ॥

आयु, वर्ण, शक्ति, आरोग्य, उत्साह, पुष्टि, कांति, ओज, तेज, भूक व प्राण या सर्वांस जठराग्नि हा कारण आहे. तो अग्नि विझाला असतां मनुष्य मरतो, यथास्थित असला ह्मणजे निरोगी राहून चिरकालपर्यंत वांचतो, आणि विकृत झाला असतां रोगी होतो. ह्मणून अग्नि हाच सर्वांचा आधार ह्मटला जातो. अन्न जें शरीर, धातु, ओज, शक्ति, वर्ण इत्यादिकांचें पोषण करितें त्यास ही कारण अग्निच आहे. अग्नीनें आहार पक्व न झाल्यास रसादि धातु उत्पन्न होणार नाहींत. शरीरांतील प्राणवायूचें मुख्य काम अन्न ग्रहण करण्याचें आहे. तो खाल्लेलें अन्न कोठ्यांत ( आमाशयांत ) घेऊन जातो. त्या ठिकाणीं कफातील द्रवांशाच्या योगानें तें पातळ होतें. आणि स्निग्धतेनें नरम होतें. नंतर उदरस्थ समान वायु जठराग्नीस वारा घालून प्रदीप्त करितो. तो अग्नि योग्यकाळीं योग्यरीतीनें खाल्लेलें अन्न चांगल्या रीतीनें पचवितो. आणि त्यापासून आयुष्याची वृद्धि होते. ज्याप्रमाणें भांड्यांत तांदूळ व पाणी घालून त्याच्या खालीं विस्तव पेटविला असतां तो त्याचा भात बनवितो त्याप्रमाणें जठराग्नि हा आमाशयांतील अन्नाचें पचन करून त्यापासून रस व मळ बनवितो. आपण जें षड्रसयुक्त अन्न खातों तें पचन होऊं लागलें ह्मणजे प्रथम कफात्मक मधुररसानें तें फेंसदार होतें. नंतर त्यांतील आंबटपणानें त्याचें अर्धवट पचन होऊन तें आमाशयांतून हळू हळू झिरपून पक्वाशयांत येतें. या विदग्धावस्थेंत स्वच्छ पित्त

प्रकट होतें. पक्वाशयांत अन्न गेलें म्हणजे तेथें तें जठराग्नीच्या योगानें पक्व व शुष्क होऊन त्याचा गोळा होतो. या स्थितींत त्याच्या निबद्दपणानें वायूचें प्राधान्य असतें. अभीष्ट अन्न खाल्लें असतां तें प्रिय गन्धादिकांच्या योगानें शरीरास व घ्राणादि इन्द्रियांस प्रसन्न करितें.

भौमाप्याग्नेयवायव्याः पञ्चोष्माणः सनाभसाः
पञ्चाहारगुणान्स्वान्स्वान्पार्थिवादीन्पचन्ति हि ॥ ११ ॥
यथा स्वं स्वञ्च पुष्यन्ति देहद्रव्यगुणाः पृथक् ।
पार्थिवाः पार्थिवानेव शेषाः शेषांश्च कृत्स्नशः ॥ १२ ॥
सप्तभिर्देहधातारो द्विविधाश्च पुनः पुनः ।
यथास्वमग्निभिः पाकं यान्ति किट्टप्रसादवत् ॥ १३ ॥
रसाद्रक्तं ततो मांस मांसान्मेदस्ततोऽस्थिच ।
अस्थ्नो मज्जाततः शुक्रं शुक्राद्गर्भः प्रजायते ॥ १४ ॥
रसात्स्तन्यं ततो रक्तमसृजः कण्डराः शिराः ।
मांसाद्वसा त्वचःषट् च मेदसः स्नायुसम्भवः ॥ १५ ॥
इत्युक्तवन्तमाचार्यं शिष्यस्त्विदमचोदयत् ।
रसाद्रक्तं विसदृशात्कथं देहेभिजायते ॥ १६ ॥
रसस्य च न रङ्गोऽस्ति स कथं याति रक्तताम् ।
रसाद्रक्तास्थिरं मांसं कथं तज्जायते नृणाम् ॥ १७ ॥
रसाद्रक्तात्तथामांसान्मेदसः श्वेतता कथम् ।
श्लक्ष्णाभ्यां मांसमेदोभ्यां खरत्वं कथमस्थिषु ॥ १८ ॥
खरेष्वस्थिषु मज्जा च केन स्निग्धो मृदुस्तथा ।
मज्ज्ञश्च परिणामेन यदि शुक्रं प्रवर्तते ॥ १९ ॥
सर्वदेहगतं शुक्रं प्रवदन्ति मनीषिणः ।

**अथापि मध्ये मज्जश्च शुक्रं भवति देहिनाम् ॥ २० ॥**
**छिद्रं न दृश्यतेऽस्थ्नाश्च तन्निस्सरति वा कथम् ।**

शरीर हें पांचभौतिक आहे. त्या पांच भूतांची पार्थिव, आप्य, आग्नेय, वायवीय, व आकाशीय अशी पांच प्रकारची उष्णता शरीरांत आहे. आपण जें अन्न खातों तें ही पांचभौतिकच आहे. त्या त्या प्रकारची उष्णता खाल्लेल्या अन्नांतील त्या त्या महाभूताच्या पार्थिवादि अंशाचें पचन करिते आणि पंचभूतात्मक शरीराच्या व पदार्थांच्या त्या त्या गुणांस पुष्टि देते. अन्नाचे गुरु, खर इत्यादि पार्थिव गुण शरीराच्या या गुणांची वृद्धि करितात. याचप्रमाणें इतर महाभूतांच्या गुणांविषयींही समजावें. याचप्रमाणें रसादि सातधातूंचें ही त्या त्या प्रकारच्या उष्णतेनें पचन होऊन त्यांचा मल व प्रसाद असा दोन प्रकारचा परिणाम होतो. अन्नाच्या रसापासून रक्त, रक्तापासून मास, मांसापासन, चरबी, चरबी पासून हाडें, हाडांपासून मज्जा, मज्जेपासून वीर्य आणि वीर्यापासून गर्भ या क्रमानें यांची उत्पत्ति होते. तसेंच रसापासून दूध, दुधापासून रक्त, रक्तापासून कंडरा व शिरा, मांसापासून वसा व सहा प्रकारच्या त्वचा आणि मेदापासून स्नायु उत्पन्न होतात. आत्रेय महर्षींचें हें निरूपण ऐकून अग्निवेश शिष्यानें प्रश्न केले कीं, महाराज! रस व रक्त या दोहोंचें स्वरूप एकमेकाहून अगदीं निराळें असून रसापासून रक्ताची उत्पत्ति कशी संभवते ? रसांत तर मुळींच रंग नाहीं मग त्यापासून तांबडें रक्त कसें बनतें ? दुसरें पातळ रसरक्तापासून घट्ट मांस कसें बनतें ? रस, रक्त व मांस यांपासून उत्पन्न होणारी चरबी पांढरी कशी होतें? गुळगुळीत-नरम मांस व मेदापासून बनणारीं हाडें खरखरीत कशीं होतात ? खरखरीत हाडांपासून होणारी व त्यांत राहणारी मज्जा चिकट व नरम कशी होते? आणि जर मज्जेपासून वीर्य बनतें व मज्जा हाडांत असते, तर विद्वानांच्या म्हणण्या प्रमाणें सर्व शरीर व्यापून असणारें वीर्य हाडांत छिद्र न दिसतां बाहेर कसें झिरपतें?

**एवमुक्तस्तु शिष्येण गुरुः प्राहेदमुत्तरम् ॥ २१ ॥**
**तेजोरसानां सर्वेषां मनुजानां यदुच्यते ।**

पित्तोष्मणः सरागेण रसो रक्तत्वमृच्छति ॥ २२ ॥
वाय्वग्नितेजसा रक्तमूष्मणा चाभिसंयुतम् ।
स्थिरतां प्राप्य शौक्ल्यञ्च मेदो देहेऽभिजायते ॥ २३ ॥
पृथिव्यम्ब्वनिलादीनां सङ्घातः श्लेष्मणावृतः ।
खरत्वं प्रकरोत्यस्य जायतेऽस्थि ततो नृणाम् ॥ २४ ॥
करोति तत्र सौषिर्यमस्थ्नां मध्ये समीरणः ।
मेदसस्तानि पूर्यन्ते स्नेहो मज्जा ततः स्मृतः ॥ २५ ॥
तस्मान्मज्ज्ञस्तु यः स्नेहः शुक्रं सञ्जायते ततः ।
वाय्वाकाशादिभिर्भावैः सौषिर्यं जायतेऽस्थिषु ॥ २६ ॥
तेन स्रवति तच्छुक्रं नवात्कुम्भादिवोदकम् ।
स्रोतोऽभिष्यन्दते देहात्समन्ताच्छुक्रवाहिभिः ॥ २७ ॥
हर्षेणोदीरितं रागात्सङ्कल्पाच्च मनोभवात् ।
विलीनं घृतवद्व्यायामोष्मणा स्थानविच्युतम् ॥ २८ ॥
बस्तौ सम्भृत्य निर्याति स्थलान्निम्नादिवोदकम् ।
किट्टमन्नस्य विण्मूत्रं रसस्य च कफोऽसृजः ।
पित्तं मांसस्य च मलो मलः स्वेदस्तु मेदसः ।
स्यात्किट्टं केशलोमास्थ्नो मज्ज्ञः स्नेहोऽक्षिविट्त्वचाम् ॥ ३० ॥
प्रसादकिट्टे धातूनां पाकादेवंविधः स्मृतः ।

याप्रमाणें अग्निवेशाचे प्रश्न ऐकून आत्रेय महर्षि सांगते झाले कीं — मनुष्याच्या आहार रसांत जो तैजस अंश असतो तो, व पित्ताची उष्णता यांच्या योगानें रसांत लाली येऊन त्याचें रक्त बनतें. पुढें त्या रक्तांत वायु व अग्नि तेज यांची उष्णता मिळून तें घट्ट होतें अर्थात् त्यास मांसाचें स्वरूप येतें. सदरहू कारणांनींच पुढें त्यास पांढरेपणा येऊन मेद बनतो. पृथिव्यादि पंच महाभूतें कफानें आच्छादित होऊन मेदास खरखरीतपणा

आणून त्याचें हाड बनवितात. त्यांत पुढें वायु छिद्रें करितो. त्या छिद्रांतून मेद भरतो. त्या स्निग्ध पदार्थास मज्जा ह्मणतात. त्या मज्जेचा जो स्निग्ध अंश त्यापासून वीर्य बनतें. वायु व आकाशादि महाभूतांच्या योगानें हाडांत बारीक बारीक रन्ध्रें उत्पन्न होतात. त्यांतून, जसें कोऱ्या मडक्यांतून पाणी, तसें वीर्य झिरपतें. त्या योगानें सर्व शरीरांतील वीर्यवाहक स्रोतें ओलीं-चिकट झालेलीं असतात. कामवासनेनें, रतिविषयक प्रीतीनें किंवा मैथुनादि व्यायामाच्या योगानें उत्पन्न होणाऱ्या उष्णतेनें तुपाप्रमाणें विरघळून पातळ होऊन आपापल्या स्थानापासून सुटून बस्तींत सांचून जसें उतरत्या जागेवरून पाणी खालीं घरळत जातें तसें तें इंद्रियांतून बाहेर पडतें. अन्नाचा मल ( किट्ट ) विष्टा व मूत्र, रसाचा मल कफ, रक्ताचा व मांसाचा मल पित्त, मेदाचा मल घाम, हाडांचा मल केंस व लोम आणि मज्जेचा मल डोळ्यांतील, विष्ठेंतील व त्वचेंतील स्निग्धभाग. याप्रमाणें धातूंचा पाक होऊन त्यांपासून प्रसाद व मल अर्थात् उपयोगी व त्याज्य भाग बनतात.

परस्परोपसंस्तंभा धातुस्नेहपरम्परा ॥ ३१ ॥
वृष्यादीनां प्रभावस्तु पुष्णाति बलमाशु हि ।
षड्भिः केचिदहोरात्रैरिच्छन्ति परिवर्तनम् ॥ ३२ ॥
सन्तत्या भोज्यधातूनां परिवृत्तिस्तु चक्रवत ।
व्यानेन रसधातुर्हि विक्षेपोचितकर्मणा ॥ ३३ ॥
युगपत्सर्वतोऽजस्रं देहे विक्षिप्यते सदा ।
क्षिप्यमाणस्तु वैगुण्याद्रसः सज्जति यत्र सः ॥ ३४ ॥
करोति विकृतिश्चात्र खे वर्षामिव तोयदः ।
दोषाणामपि चैवं स्यादेकदेशप्रकोपणम् ॥ ३५ ॥
इति भौतिकधात्वन्नपक्तृणां कर्म भाषितम् ।
अन्नस्य पक्ता सर्वेषां पक्तॄणामधिको मतः ॥ ३६ ॥
तन्मूलास्ते हि तद्वृद्धिक्षयवृद्धिक्षयात्मकाः ।

तस्मात्तं विधिवद्युक्तैरन्नपानैश्चनैर्हितैः ॥ १७ ॥
पालयेत्प्रयतस्तस्य स्थितौ ह्यायुर्बलस्थितिः ।
योऽहि भुंक्ते विधिं मुक्त्वा ग्रहणीदोषपावकात् ॥ १८ ॥
स लौल्याल्लभते शीघ्रं वक्ष्यन्तेऽतः परन्तु ये ।

धातूंचा स्नेह ह्मणजे सार त्यांची जी परंपरा अर्थात् रसादि सात धातु हे परस्पर रूपांतर होऊन तयार असतात. पुढील धातु मागील धातूचा सार असतो. याप्रमाणें रक्तापासून तों वीर्यापर्यंत सर्व धातु एक दुसऱ्याचा सार निघून बनतात. ह्मणजे रसाचा सार रक्त, त्या रक्ताचा सार मांस, मांसाचा सार मेद याप्रमाणें क्रमानें सार निघत निघत शुक्रापर्यंत सातही धातु बनतात. अर्थात्च ते उत्तरोत्तर श्रेष्ठ आहेत. वृष्यादि पदार्थ जी एकदम वीर्यवृद्धि वगैरे करितात ती आपल्या स्वभावाच्या योगानें होय. ह्मणजे दूध वगैरे पदार्थ सेवन केले असतां त्यापासून तत्काल वीर्य वाढतें. इतर पदार्थाप्रमाणें क्रमशः परिणाम होत होत वीर्य बनत नाहीं. यास कारण अशा प्रकारच्या पदार्थांतील अचिन्त्यशक्ति हेंच होय. कांहीं आचार्यांच्या मतें अन्नाचा परिणाम होऊन वीर्य बनण्यास सहा दिवस लागतात. कित्येकांच्या मतें हें कार्य एकच दिवस-रात्रींत होतें. वास्तविक सिद्धान्त असा आहे कीं, अन्नरसापासून तों मज्जापर्यंतचे जे पोष्य धातु ( ज्या धातूपासून जो धातु बनतो तो त्याचा पोष्य धातु ) त्यांचा पुढचा एखाद्या चक्राप्रमाणें अविच्छिन्न चालतो [illegible] व पुढें नाश हीं नेहमी [illegible] उत्पन्न होत [illegible] कांहीं काळ [illegible] आहे. शरीरांतील [illegible] धातु [illegible] [illegible] [illegible] निरनिराळे [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] कांहीं [illegible] [illegible] ठिकाणीं [illegible] कर्ता [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] अनुमानानें [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible] [illegible]

होतो. याप्रमाणें भूताग्नि, धात्वग्नि व अन्नपाचक-जठराग्नि यांचीं कर्में सांगितलीं. या सर्व अग्नींत अन्नपाचक जठराग्नि श्रेष्ठ होय. कारण तोच इतर सर्व अग्नींचें मूळ आहे. त्याच्याच वृद्धिक्षयावर इतरांची वृद्धि-क्षय हीं अवलंबून असतात. म्हणून विधिपूर्वक हितकर अन्नपानरूपी सरपण घालून या जठराग्नीचें मद्दून रक्षण करावें. कारण कीं याच अग्नीवर आयुष्य व बल यांची स्थिति अवलंबून आहे. जो मनुष्य विधि सोडून लंपटपणानें मनास वाटेल तसा आहार करितो त्याची ग्रहणी बिघडून त्यास लवकरच पुढें सांगितलेले रोग उत्पन्न होतात.

अभोजनादजीर्णातिभोजनाद्विषमाशनात् ॥ ३९ ॥
असात्म्यगुरुशीतातिरूक्षसन्दुष्टभोजनात् ।
विरेकवमनस्नेहविभ्रमाद्व्याधिकर्षणात् ॥ ४० ॥
देशकालर्तुवैषम्याद्वेगानां च विधारणात् ।
दुष्यत्यग्निः स दुष्टोऽन्नं न तत्पचति लघ्वपि ॥ ४१ ॥
अपच्यमानं शुक्तत्वं यात्यन्नं विषतां च तत् ।
तस्य लिङ्गमजीर्णस्य विष्टम्भोऽङ्गस्य सीदति ॥ ४२ ॥
शिरसो रुक्च मूर्च्छा च भ्रमः पृष्ठकटिग्रहः ।
जृम्भाङ्गमर्दस्तृष्णा च ज्वरश्छर्दिः प्रवाहणम् ॥ ४३ ॥
अरोचकोऽविपाकश्च घोरमन्नविषं च तत् ।
संसृज्यमानं पित्तेन दाहं तृष्णां मुखामयान् ॥ ४४ ॥
जनयत्यम्लपित्तं च पित्तजांश्चापरान्गदान् ।
यक्ष्मपीनसमेहादीन्कफजान्कफसङ्गतः ॥ ४५ ॥
करोति वातसंसृष्टं वातजांश्च गदान्बहून् ।
मूत्ररोगांश्च मूत्रस्थं कुक्षिरोगान् शकृद्गतम् ॥ ४६ ॥
रसादिभिश्च संसृष्टं कुर्याद्रोगान् रसादिजान् ।

उपास, अजीर्ण, अतिभोजन, असात्म्य, जड, थंड, अतिशय रूक्ष, किंवा दूषित अन्न खाणें, विरेचन, वमन, स्नेहन या कर्मांत चूक

होणें; रोगानें अशक्त होणें; देश—काल—ऋतु बिघडल्यानें किंवा मलमूत्रादिकांचे वेग थांबविल्यानें पाचक अग्नि दूषित होतो. तो दूषित अग्नि हलक्या अन्नाचें देखील पचन करूं शकत नाहीं. अन्न अपक्व राहिलें म्हणजे त्यांत अम्लत्व ( आंबटपणा ) येऊन विषाचे गुण येतात. अजीर्ण झालें असतां अवष्टंभ होतो, हातपाय गळतात, डोकें दुखतें, मूर्च्छा व भोंवळ येते, पाठ व कंबर धरते, आंभया येतात, अंग वळतें, तहान लागते, ताप येतो, उलटी व जुलाब होतात, तोंडाची रुचि नाहींशी होते व अन्न पचत नाहीं. हें अन्नविष भयंकर होय. हें पित्ताशीं मिळालें असतां दाह, तहान, मुखरोग, अम्लपित्त व इतर पित्तरोग उत्पन्न करितें. कफाशीं मिळालें असतां कफ क्षय, पीनस, प्रमेह वगैरे कफज रोग उत्पन्न करितें. वाताशीं मिळालें असतां अनेक प्रकारचे वातरोग उत्पन्न करितें. मूत्रांत गेलें असतां मूत्रसंबंधी रोग, आणि मलाशीं मिळालें असतां उदररोग उत्पन्न करितें. तसेंच रसादि धातूंशीं मिळालें असतां त्या त्या धातूंचे रोग उत्पन्न करितें.

विषमो धातुवैषम्यं करोति विषमं पचन् ॥ ४७ ॥
तीक्ष्णो मन्देन्धनो धातून्विशोषयति पावकः ।
युक्तं भुक्तवतो युक्तो धातुसाम्यं समं पचन् ॥ ४८ ॥
दुर्बलो विदहत्यन्नं तद्यात्यूर्ध्वमधोपि वा ।
अधश्च पक्वमामं वा प्रवृत्तं ग्रहणीगदः ॥ ४९ ॥
उच्यते सर्वमेवान्नं प्रायो ह्यस्य विदह्यते ।
अतिसृष्टं विबद्धं वा द्रवं तदुपवेश्यते ॥ ५० ॥
तृष्णारोचकवैरस्यप्रसेकतमकान्वितः ॥
शूनपादकरः सास्थिपर्वरुक् छर्दनं ज्वरः ॥५१ ॥
लोहामगन्धिस्तिक्ताम्ल उद्गारश्चास्य जायते ।
पूर्वरूपन्तु तस्येदं तृष्णालस्यं बलक्षयः ॥५२ ॥

विदाहोऽन्नस्य पाकश्च चिरात्कायस्य गौरवम् ॥
अग्न्यधिष्ठानमन्नस्य ग्रहणाद्ग्रहणी मता ॥ ५३ ॥
नाभेरुपरि सा ह्यग्निबलोपस्तम्भबृंहिता ॥
अपक्वं धारयत्यन्नं पक्वं सृजति पार्श्वतः ॥ ५४ ॥
दुर्बलाग्निबलाद्दुष्टा त्वाममेव विसृजति ॥
वातात्पित्तात्कफात्सर्वाद्ग्रहणीदोष उच्यते ॥ ५५ ॥
हेतुं लिङ्गं चिकित्सां च शृणु तस्याः पृथक् पृथक् ॥

पाचक अग्नि विषम असल्यास अन्नाचें विषम (अनियमित) पचन घडून धातूंत वैषम्य उत्पन्न करितो. तीक्ष्ण असून त्यास अन्नपानरूपी इंधन कमी मिळाल्यास तो धातूंचें शोषण करितो. समान अग्नि, युक्त भोजनानें चांगलें नियमपूर्वक पचन करून धातुसाम्य राखतो. अग्नि मंदावक असल्यास अन्नाचा विदाह करितो. व तें अर्धवट कच्चें व अर्धवट शिजलेलें अन्न वर किंवा खालीं जातें. तें पक्व किंवा अपक्व अन्न ग्रहणीच्या मार्गानें बाहेर पडूं लागलें म्हणजे त्यास ग्रहणी रोग म्हणतात. या रोगांत रुग्णाचें बहुतेक सर्व अन्न विदग्ध होतें आणि तें पातळ होऊन अवष्टंभयुक्त थोडथोडें किंवा अतिशय शौचास होतें, तहान लागते, अन्नावर अरुचि होते, तोंडाची चव बिघडते, लाळ गळते, तमक श्वास लागतो, हात पाय सुजतात, हाडें व पेरें दुखतात, उलटी होते, ताप येतो, आणि लोहासारखे किंवा हिरवट असे कडवट आंबट ढेकर येतात. तहान, आळस, शक्तिक्षय, अन्नाचा विदाह, अन्न उशिरां पचणें आणि अंग जड होणें हें संग्रहणीचें पूर्वरूप होय. अन्नाचें अधिष्ठान जो अग्नि तो ग्रहण करितो म्हणून तीस ग्रहणी म्हणतात. ही बेंबीच्या वर असून तिची स्थिति व पुष्टि अग्नीवर अवलंबून आहे. ही अपक्व अन्न धारण करून पक्व अन्न बाजूनें सोडते. अग्नि अशक्त झाला असतां ही ग्रहणी अशक्त व दूषित होऊन आमच अन्न सोडते. वातज, पित्तज, कफज व सान्निपातिक असे एकंदर चार प्रकारचे

ग्रहणीरोग आहेत. त्या प्रत्येकाचीं निरनिराळीं कारणें, लक्षणें, व चिकित्सा सांगतों ती ऐक.

कटुतिक्तकषायातिरूक्षशीतलभोजनैः ॥ ५६ ॥
प्रमितानशनात्यध्ववेगनिग्रहमैथुनैः ॥
करोति कुपितो मन्दमग्निं संछाद्य मारुतः ॥ ५७ ॥
तस्यान्नं पच्यते दुःखं शुक्तपाकं खराङ्गता ॥
कण्ठास्यशोषः क्षुत्तृष्णा तिमिरं कर्णयोः स्वनः ॥ ५८ ॥
पार्श्वोरुवङ्क्षणग्रीवारुजोऽभीक्ष्णं विसूचिका ॥
हृत्पीडाकार्श्यदौर्बल्यं वैरस्यं परिकर्तिका ॥ ५९ ॥
गृद्धिः सर्वरसानाञ्च मनसः सदनं तथा ॥
जीर्णे जीर्यति चाध्मानं भुक्ते स्वास्थ्यमुपैति च ॥ ६० ॥
स वातगुल्महृद्रोगप्लीहाशङ्की च मानवः ।
चिराद्दुःखं द्रवं शुष्कं तन्वामं शब्दफेनवत् ॥ ६१ ॥
पुनःपुनः सृजेद्वर्चः कासश्वासान्वितोऽनिलात् ॥

तिखट, कडू, तुरट, अतिशयरूक्ष, व थंड भोजन; एकाच रसानें भोजन, उपास, फार मार्ग चालणें, वेग थांबविणें व अति मैथुन या कारणांनीं वायु कुपित होऊन अग्नीस आच्छादित करून मंद करितो. (त्यापासून संग्रहणी होते.) त्या वातज संग्रहणींत अन्न कष्टानें पचतें, अम्लपाक होतो, अंग खरखरीत होतें, घसा व तोंडास कोरड पडते, भूक-तहान लागते, डोळ्यांपुढें अंधेरी येते, कानांतून आवाज होतो, बरगड्या, मांड्या, जांघाडे व मान यांत अतिशय पीडा होते, विसूचिका होते, हृदयांत पीडा होते, कृशता व अशक्तता येते, तोंडाची चव बिघडते, मलद्वारांत कातरल्यासारखी पीडा होते, सर्व रस खावेसे वाटतात, मन उद्विग्न होतें, अन्न जिरल्यावर व जिरत असतां पोट फुगतें आणि जेवल्यावर बरें वाटतें, आपल्यास वातगुल्म, हृद्रोग किंवा प्लीहा

आहे असें रोग्यास वाटतें, आणि फार वेळानें, कष्टानें, पातळ ( शुष्क नव्हे तें ), शुष्क, पातळ ( दाट नव्हे तें) अपक्व, फेंसाळ व शब्द करून वरचेवर शौचास होतें. त्यास खोकला व दमा ही असतो.

कट्वजीर्णविदाह्यम्लक्षाराद्यैःपित्तमुल्बणम् ॥ ६२ ॥
अग्निमाप्लावयद्धान्ति जलं तप्तमिवानलम् ॥
सोजीर्णं नीलपीताभं पीताभः सार्यते द्रवम् ॥ ६३ ॥
पूत्यम्लोद्गारहृत्कण्ठदाहारुचितृषार्दितः ।

तिखट, विदाही, आंबट, क्षारयुक्त पदार्थ, अजीर्ण वगैरे कारणांनीं पित्त वाढून तें ज्याप्रमाणें तापलेलें पाणी अग्नीस नष्ट करितें, त्याप्रमाणें पाचकाग्नीस बुडवून नाहींसा करितें. या पित्तजसंग्रहणींत अपक्व, निळसर–पिंवळट किंवा पिंवळट असें पातळ शौचास होतें, आणि दुर्गंधि व आंबट ढेंकर येतात; ऊर व घसा यांत जळजळतें अरुचि होते व तहान लागते.

गुर्वतिस्निग्धशीतान्नभोजनादतिभोजनात् ॥ ६४ ॥
भुक्तमात्रस्य च स्वप्नाद्धन्त्यग्निं कुपितः कफः ।
तस्यान्नं पच्यते दुःखं हृल्लासच्छर्द्यरोचकाः ॥ ६५ ॥
आस्योपदेहमाधुर्यकासष्ठीवनपीनसाः ।
हृदयं मन्यते स्त्यानमुदरं स्तिमितं गुरु ॥ ६६ ॥
दुष्टो मधुर उद्गारः सदनं स्त्रीष्वहर्षणम् ।
भिन्नामश्लेष्मसंसृष्टगुरुवर्चःप्रवर्तनम् ॥ ६७ ॥
अकृशस्यापि दौर्बल्यमालस्यञ्च कफात्मके ।
यथाग्निः पूर्वमुद्दिष्टो रोगानीके चतुर्विधः ।
तथापि ग्रहणीदोषं समवर्जं प्रचक्ष्महे ॥ ६८ ॥
पृथग्वातादिनिर्दिष्टहेतुलिङ्गसमागमे ।
त्रिदोषं निर्दिशेत्तेषां भेषजं शृण्वतः परम् ॥ ६९ ॥

जड, अतिशय स्निग्ध, थंड असें अन्न खाणें, अतिशय खाणें, आणि जेवल्याबरोबर निजणें या कारणांनीं कफ कुपित होऊन अग्नीस नष्ट करितो. त्यायोगानें अन्नपचन बरोबर होत नाहीं, मळमळतें, उलटी

होते, अन्नावर अरुचि होते, तोंड चिकट व गुळमट होतें, खोकला येतो, कफ पडतो, पीनस होतो, छाती भरल्यासारखी वाटते, पोट ताठ व जड वाटतें, दूषित गोड ढेंकर येतात, हातपाय गळतात, स्त्रियांवर अप्रीति होते आणि कच्चा, कफमिश्रित व जड अशा पातळ मळाचे जुलाब होतात. या कफज संग्रहणींत रोगी शरीरानें धष्टपुष्ट दिसला तरी अशक्त व आळशी असतो. मागें विमानस्थानांत रोगानीक विमान अध्यायांत जे चार प्रकारचे ( सम, विषम, तीक्ष्ण, मंद ) अग्नि सांगितले आहेत त्यांपैकीं सम अग्नि शिवाय बाकीचे तीन अग्नि ही संग्रहणीस कारणभूत होतात. वर वातादि निरनिराळ्या तीन दोषांपासून होणाऱ्या संग्रहणींचीं जी कारणें व लक्षणें सांगितलीं आहेत तीं एकत्र झालीं असतां त्रिदोषज संग्रहणी जाणावी. आतां यांचीं औषधें सांगतों तीं ऐक.

ग्रहणीमाश्रितं दोषं विदग्धाहारमूर्च्छितम् ।
सविष्टम्भप्रसेकार्तिविदाहारुचिगौरवम् ॥ ७० ॥
आमलिङ्गान्वितं दृष्ट्वा सुखोष्णेनाम्बुनोद्धरेत् ।
फलानां वा कषायेण पिप्पलीसर्षपैस्तथा ॥ ७१ ॥
लीनं पक्वाशयस्थं वाऽप्याममं स्रंसयेद्दीपनैः ।
शरीरानुगते सामे रसे लङ्घनपाचनम् ॥ ७२ ॥
विशुद्धामाशयायास्मै पञ्चकोलादिभिर्युतम् ।
दद्यात्पेयादि लघ्वन्नं पुनर्योगांश्च दीपनान् ॥ ७३ ॥
ज्ञात्वा तु परिपक्वामं मारुतग्रहणीगदम् ।
दीपनीययुतं सर्पिः पाययेताल्पशो भिषक् ॥ ७४ ॥
किञ्चित्सन्धुक्षिते त्वग्नौ सक्तविण्मूत्रमारुतम् ।
द्वित्र्यण्यहानि सस्नेहं स्विन्नाभ्यक्तं निरूहयेत् ॥ ७५ ॥
तत एरण्डतैलेन सर्पिषा तैल्वकेन वा ।
सक्षारेणानिले शान्ते स्रस्तदोषं विरेचयेत् ॥ ७६ ॥
शुद्धं रूक्षाशयं बद्धवर्चसं चानुवासयेत् ।
दीपनीयाम्लवातघ्नसिद्धतैलेन मात्रया ॥ ७७ ॥
निरूढश्च विरिक्तश्च सम्यक्चैवानुवासितः ।
लघ्वन्नप्रतिसम्भुक्तः सर्पिरभ्यासयेत्पुनः ॥ ७८ ॥

विदग्ध आहाराच्या योगानें मूर्छित झालेले दोष ग्रहणीस धरून राहिले असून, त्यांत अवष्टंभ, लाळ गळणें, पीडा, विदाह, अरुचि, जडपणा हीं आमाचीं लक्षणें हीं दृष्टीस पडलीं असतां कोमट पाणी, गेळफळांचा काढा, किंवा पिंपळी व शिरस यांचा काढा देऊन ते दोष काढून टाकावे. आम दोष पातळ होऊन पक्काशयांत गेल्यास दीपक औषध मिश्रित ( एरंडेल तेल किंवा आरग्वधादि ) काढा वगैरे देऊन तो काढून टाकावा. आमरस सर्वशरीरभर पसरला असतां लंघन पाचन द्यावें आणि त्यायोगानें आमाशय शुद्ध झाला म्हणजे पिंपळी, पिंपळीमूळ, चवक, चित्रक, सुंठ हीं किंवा यांसारखीं दुसरीं दीपक औषधें घालून तयार केलेली पेज वगैरे हलकें अन्न तसेंच मागें सांगितलेले अनेक प्रकारचे हलके व दीपक पदार्थ द्यावे. वातज संग्रहणींत आम पक्क झाल्यावर पंचकोल वगैरे अग्निदीपक औषध युक्त घृत थोडें थोडें पाजावें. अग्नि कांहीसा प्रदीप्त झाला असून रोग्यास मळ-मूत्र व वायु यांचा अवरोध असल्यास दोन किंवा तीन दिवस स्नेहन, आणि नंतर स्वेदन व अभ्यंग करून निरूह बस्ति द्यावा. वायूचें शमन होऊन दोष आपापल्या स्थानापासून सुटले म्हणजे रेचन होण्याकरितां थोडा जवखार टाकून एरंडेल तेल किंवा तिल्वक घृत द्यावें. शोधनानें रूक्ष होऊन मळ सुकला असल्यास दीपक, आंबट ( महाळुंग, डाळिंब वगैरे ) व ( कोष्ट, रास्ना, एरंड. वगैरे ) वातनाशक औषधांनीं सिद्ध केलेल्या घृताचा योग्य प्रमाणानें अनुवासन बस्ति दिल्यावर, हलक्या अन्नाबरोबर पुन्हां घृतपान चालू ठेवावें.

द्वे पञ्चमूले सरलं देवदारु सनागरम् ।
पिप्पली पिप्पलीमूलं चित्रकं हस्तिपिप्पलीम् ॥ ७९ ॥
शणबीजं यवान्क्षोदान्कुलत्थान्सुरभींस्तथा ।
पाचयेदारनालेन वृक्षा सौवीरकेण वा ॥ ८० ॥
चतुर्भागावशेषेण पचेत्तैलं तुलाढकम् ।
स्वर्जिकायावशूकाख्यौ क्षारौ दत्वा च युक्तितः ॥ ८१ ॥

सैन्धवोद्भिदसामुद्रबिडानां रोमकस्य च ।
ससौवर्चलपाक्यानां भागान्द्विपलिकान्पृथक् ॥ ८२ ॥
विनीयचूर्णितात्सिद्धात्ततो द्वे द्वे पले पिबेत् ।
करोत्यग्निं बलं वर्णं वातघ्नं भुक्तपाचनम् ॥ ८३ ॥

दशमूलादिघृत—दशमुळें, सरल, देवदार, सुंठ, पिंपळी, पिंपळीमूळ, चित्रक, गजापिंपळी, तागाचें बीं, जव, बोरें, कुळीत, व काळेंजिरें, हीं द्रव्यें जवांच्या किंवा गव्हांच्या कांजींत अथवा दह्यांत शिजवून चतुर्थांश उरवून त्यांत चार शेर तूप शिजवावें. आणि नंतर त्यांत चार चार तोळे सज्जीखार व जवखार आणि सैंधव, उद्भिद, सामुद्र, बिड, रोमक, संचळ व सोरा यांचें प्रत्येकीं ८।८ तोळे चूर्ण मिळवावें. यांतून दरवेळीं ८।८ तोळे तूप प्यावें ह्मणजे अग्निदीपन, बल व वर्ण यांची वृद्धि, वातनाश, आणि अन्नपचन हीं होतात.

त्र्यूषणत्रिफलाकल्के बिल्वमात्रे गुडात्पले ॥
सर्पिषोऽष्टपलं पक्त्वा मात्रां मन्दानलः पिबेत् ॥ ८४ ॥

त्र्यूषणादिघृत—त्रिकटु व त्रिफळा यांचा चार चार तोळे कल्क आणि चार तोळे गूळ घालून ३२ तोळे तूप यथाविधि मंदाग्नीवर सिद्ध करून योग्य प्रमाणानें ध्यावें.

पञ्चमूलाभयाव्योषविडङ्गशटीभिर्घृतम् ॥
शुक्तेन मातुलुङ्गस्य स्वरसेनार्द्रकस्यच ॥ ८५ ॥
शुष्कमूलककोलाम्बुचुक्रिकादाडिमस्यच ॥
तक्रमस्तुसुरामण्डसौवीरकतुषोदकैः ॥ ८६ ॥
काञ्जिकेन च तत्पक्वमग्निदीप्तिकरं परम् ॥
शूलगुल्मोदरश्वासकासानिलकफापहम् ॥ ८७ ॥
सबीजपूरकरसं सिद्धं वा पाययेद्घृतम् ॥
सिद्धमभ्यञ्जनार्थञ्च तैलमेतैः प्रयोजयेत् ॥ ८८ ॥
एतेषामौषधानां वा पिबेच्चूर्णं सुखाम्बुना ॥
वाते श्लेष्मावृते सामे कफे वा वायुनोद्धृते ।
दद्याच्चूर्णं पाचनार्थमग्निसन्दीपनं परम् ॥ ८९ ॥

**पञ्चमूलादिघृत व चूर्ण**—बिल्वादि बृहत्पञ्चमुळें, हिरडे, त्रिकटु, वावडिंग, कचोरा, यांचा कल्क आणि सूक्त, महाळुंगाचा किंवा आल्याचा स्वरस, सुके मुळे किंवा बोरांचा काढा, चुक्याचा किंवा डाळिंबाचा रस, ताक, दह्यांवरची निवळ, मद्यावरची साय, बिनसाळी च्या किंवा साळासकट जवांची कांजी अथवा धान्यकांजी यांनीं सिद्ध केलेलें तूप अत्यंत अग्निदीपक आणि शूल, गुल्म, उदर, दमा, खोकला, वात व कफ यांचा नाश करणारें आहे. महाळुंगाचा रस घालून सिद्ध केलेलें तूपही तसेंच गुणकारी आहे. वर सांगितलेलीं औषधें घालून तेल सिद्ध करून त्याची अंगास मालिश करावी. किंवा वरील औषधांचें चूर्ण कोमट पाण्याबरोबर घ्यावें. कफाच्छादित वायु, आमकफ, किंवा वाताच्छादित कफ या दोषांत सदरहू चूर्ण द्यावें. हें उत्कृष्ट पाचक व अग्निदीपक आहे.

मज्जत्यामा गुरुत्वाद्विट् पक्वा तूत्प्लवते जले ।
विनातिद्रवसङ्घातशैत्यश्लेष्मप्रदूषणात् ॥ ९० ॥
परीक्ष्यैवं पुरा सामं निरामं वा सदोषिणाम् ।
विधिनोपाचरेत्सम्यक्पाचनेनेतरेण वा ॥ ९१ ॥

मल अपक्व असल्यास जडपणामुळें पाण्यांत बुडतो आणि पक्व असल्यास पाण्यावर तरंगतो. अति पातळ, अति घट्ट, अति शीत किंवा कफदूषित अशा मळास मात्र वरील नियम लागू नाहीं. कारण अशा प्रकारचा मळ पक्व असूनही पाण्यांत बुडतो. याप्रमाणें रोग्याचा मळ पक्व आहे किंवा अपक्व याची पूर्वी परीक्षा करून पाचक किंवा रेचक, दीपक वगैरे जें योग्य वाटेल तें औषध यथाविधि द्यावें.

चित्रकं पिप्पलीमूलं द्वौ क्षारौ लवणानि च ।
व्योषं हिङ्ग्वजमोदाश्च चव्यं चैकत्र चूर्णयेत् ॥ ९२ ॥
गुडिका मातुलुङ्गस्य दाडिमस्य रसेन वा ।
कृता विपाचयन्त्यामं दीपयन्त्याशु चानलम् ॥ ९३ ॥

**चित्रकादि गुटिका**—चित्रक, पिंपळीमूळ, सज्जीखार, जवखार, सैंधव, बिडलोण, संचळ, टांकण व समुद्राचें मीठ, त्रिकटु, हिंग, अजमोदा, चवक या सर्व जिनसांचें समभाग चूर्ण घेऊन त्यांच्या महा-ळुंगाच्या किंवा डाळिंबांच्या रसांत गोळ्या करून त्या द्याव्या. या आमाचें पचन करून अग्नीस प्रदीप्त करितात.

नागरातिविषामुस्तक्वाथः स्यादामपाचनः ।
मुस्तान्तकल्कः पथ्या वा नागरं चोष्णवारिणा ॥ ९४ ॥
देवदारुवचामुस्तनागरातिविषाभयाः ।
वारुण्यामासुतास्तोये कोष्णे वा लवणं पिबेत् ॥ ९५ ॥
पिबेत्सपरिकर्तामे मले वा दाडिमाम्बुना ।
बिडेन लवणं पिष्टं बिल्वं चित्रकनागरम् ॥ ९६ ॥
वर्चस्यामे सशूले च पिबेद्वा दाडिमाम्बुना ।
सामे वा सकफे वाते कोष्ठशूलकरे पिबेत् ॥ ९७ ॥
कलिङ्गहिंग्वतिविषावचासौवर्चलाभयाः ।
छर्द्यर्शोग्रन्थिशूलेषु पिबेदुष्णेन वारिणा ॥ ९८ ॥
पथ्यासौवर्चलाजाजीचूर्णं मरिचसंयुतम् ।
अभयां पिप्पलीमूलं वचां कटुकरोहिणीम् ॥ ९९ ॥
पाठां वत्सकबीजानि चित्रकं विश्वभेषजम् ।
पिबेन्निष्क्वाथ्य चूर्णानि कृत्वा कोष्णेन वारिणा ॥ १०० ॥
पित्तश्लेष्माभिभूतायां ग्रहण्यां शूलनुद्धितम् ।
सामे सातिविषाव्योषलवणक्षारहिङ्गुवत् ।
निष्क्वाथ्य पाययेच्चूर्णं कृत्वा वा कोष्णवारिणा ॥ १०१ ॥
पिप्पलीं नागरं पाठां शारिवां बृहतीद्वयम् ।
चित्रकं कौटजं बीजं लवणान्यथ पञ्च च ॥ १०२ ॥
तच्चूर्णं सयवक्षारं दध्युष्णाम्बुसुरासिभिः ।
पिबेदग्निविवृद्ध्यर्थं कोष्ठवातहरं नरः ॥ १०३ ॥

सुंठ, अतिविष, व नागरमोथा यांचा काढा आमपाचक आहे तो घ्यावा. सदरहू औषधांचा कल्क, हिरड्यांचें चूर्ण अथवा सुंठीचें चूर्ण ऊन पाण्याबरोबर घ्यावें. देवदार, वेखंड, नागरमोथा, सुंठ अतिविष व हिरडे यांचें चूर्ण व सैंधव मद्यांत भिजत ठेवून तें मद्य घ्यावें. किंवा हें चूर्ण कोमट पाण्याबरोबर घ्यावें. आम मल असून गुदांत कातरल्यासारखी पीडा होत असल्यास डाळिंबाच्या काढ्यांतून बिडलोण वाटून घ्यावें. आममळ असून शूळ होत असल्यास अथवा आम वातकफ असून पोटांत दुखत असल्यास कच्चें बेलफळ, चित्रक, व सुंठ हीं डाळिंबाच्या सालीच्या काढ्यांतून घ्यावीं. वांति, मूळव्याध, ग्रंथि, शूळ या विकारांत इंद्रजव, हिंग, अतिविष, वेखंड, संचळ व हिरडे यांचें चूर्ण ऊन पाण्याबरोबर घ्यावें. हिरडे, संचळ, काळें जिरें व मिरें यांचें चूर्ण ऊन पाण्याबरोबर घ्यावें. पित्त–दूषित ग्रहणींत शूळ होत असल्यास हिरडे, पिंपळीमूळ, वेखंड, कुटकी, पहाडमूळ, इंद्रजव चित्रक व सुंठ यांचा काढा घ्यावा. किंवा यांचें चूर्ण करून कोमट पाण्याबरोबर घ्यावें. आमपित्त कफदोषांत अतिविष, त्रिकटु, सैंधव जवखार व हिंग यांचा काढा अथवा कोमट पाण्याबरोबर चूर्ण करून घ्यावें. अग्नि प्रदीप्त करण्याकरितां व कोठ्यांतील वात काढून टाकण्याकरिता पिंपळी, सुंठ, पहाडमूळ, उपळसरी, रिंगणी, डोरली, चित्रक, इंद्रजव व पंचलवणें यांचें चूर्ण जवखार मिळवून दहीं, ऊनपाणी किंवा मद्यादिकांबरोबर घ्यावें.

मरिचः कुञ्चिकाम्बष्ठावृक्षाम्लाः कुडवाः पृथक् ।
पलानि दश चाम्लस्य वेतसस्य पलार्द्धकम् ॥ १०४ ॥
सौवर्चलं बिडं पाक्यं यवक्षारः ससैन्धवः ।
शटीपुष्करमूलानि हिङ्गु हिङ्गुशिराटिका ॥ १०५ ॥
तत्सर्वमेकतः सूक्ष्मं चूर्णं कृत्वा प्रयोजयेत् ।
हितं वाताभिभूतायां ग्रहण्यामरुचौ तथा ॥ १०६ ॥

मरिचादि चूर्ण—मिरें, काळें जिरें, पहाडमूळ व अमसोलें हीं प्रत्येकीं १६ तोळे, अम्लवेतस ४० तोळे, संचळ, बिडलोण, सोराखार, जवखार, सैंधव, कचोरा, पुष्करमूळ, हिंग व वेणुपत्री गवत हीं प्रत्येकीं दोन दोन तोळे याप्रमाणें सर्वांचें बारीक चूर्ण करून तें पूर्वोक्त अनुपानानें घ्यावें. हें वातदूषित ग्रहणी व अरुचि यांवर हितकर आहे.

चतुर्णां प्रस्थमम्लानां त्र्यूषणाच्च पलत्रयम् ।
लवणानाञ्च चत्वारि शर्करायाः पलाष्टकम् ॥ १०७ ॥
तच्चूर्णं शाकसूपान्नरागादिष्ववचारयेत् ।
कासाजीर्णारुचिश्वासहृत्पाण्ड्वामयगुल्मनुत् ॥ १०८ ॥
चव्यत्वक्पिप्पलीमूलधातकीव्योषचित्रकम् ।
कपित्थं बिल्वमम्बष्ठां शाल्मलं हस्तिपिप्पलीम् ॥ १०९ ॥
शिलोद्भेदं तथाजाजीं पिष्ट्वा बदरभागिकम् ।
परिभर्ज्य घृते दध्ना यवागूं साधयेद्भिषक् ॥ ११० ॥
रसैः कपित्थचुक्रिका वृक्षाम्लैर्दाडिमस्य च ।
सर्वातिसारमन्दाग्निगुल्मार्शः प्लीहनाशिनी ॥ १११ ॥

अमसोलें, अम्लवेतस, डाळिंब व बोरें हीं चार मिळून एक शेर, त्रिकुटु १२ तोळे, चार लवणें मिळून १६ तोळे आणि खडीसाखर ३२ तोळे या सर्व जिनसांचें चूर्ण करून तें भाजी, आमटी, भात, कढी वगैरे पदार्थांत मिळवून घ्यावें. हें खोकला, अजीर्ण, अरुचि, दमा, हृद्रोग, पांडु व गुल्म यांचा नाश करितें. चवक, दालचिनी, पिंपळीमूळ, धायटीचीं फुलें, त्रिकटु, चित्रक, कंवठाचा गर, कच्चें बेलफळ, पहाडमूळ एकेक तोळा वाटून मोचरस, गजपिंपळी, दगड फूल व काळें जिरें हीं घालून, दहीं, कंवठ, चुका, आमसोलें किंवा डाळिंब यांच्या रसांत तुपाची फोडणी देऊन कण्हेरी सिद्ध करून घ्यावी. ही सर्व प्रकारचे अतिसार, अग्निमान्द्य, गुल्म, मूळव्याध, व प्लीहा यांचा नाश करिते.

पञ्चकोलकयूषश्च मूलकानाञ्च सोषणः ।
स्निग्धो दाडिमतक्राम्लो जाङ्गलः संस्कृतो रसः ॥ ११२ ॥
क्रव्यादस्वरसः शस्तो भोजनार्थे सदीपनः ।
तक्रारनालमद्यानि पानार्थेऽरिष्ट एव च ॥ ११३ ॥

पञ्चकोल घालून केलेलें मुग वगैऱ्यांचें कढण, मिरें टाकून केलेलें सुक्या मुळ्यांचें कढण, डाळिंब किंवा ताकाची आंबटाण घालून तुपाची फोडणी दिलेला जांगल मांसाचा शोरुवा, तसेंच दीपक औषधें घालून तयार केलेला मांसाहारी प्राण्यांचा मांसरस हीं भोजनास प्रशस्त आहेत. पिण्यास ताक, कांजी, मद्य, अरिष्ट हीं द्यावी.

तक्रन्तु ग्रहणीदोषे दीपनग्राहिलाघवात् ।
श्रेष्ठं मधुरपाकित्वान्नच पित्तं प्रकोपयेत् ॥ ११४ ॥
कषायोष्णविकासित्वाद्रौक्ष्याच्चैव कफे मतम् ।
वाते स्वाद्वम्लसान्द्रत्वात्सद्यस्कमविदाहितत् ॥ ११५ ॥
तस्मात्तक्रप्रयोगा ये जठराणां तथार्शसाम् ।
विहिता ग्रहणीदोषे सर्वशस्तान्प्रयोजयेत ॥ ११६ ॥

ताक दीपक, ग्राहक व हलकें असल्यामुळें संग्रहणीवर उत्कृष्ट पथ्यकर आहे. तें आंबट आहे तरी त्याचा विपाक मधुर होत असल्यामुळें तें पित्तास प्रकुपित करीत नाहीं. तुरट, उष्ण, विकासी व रूक्ष असल्यामुळें कफासहि पथ्यकर आहे. गोड, आंबट व निकट असल्यामुळें वातावरही चांगलें आहे. तें ताजें केलेलें असलें ह्मणजे विदाहही करीत नाहीं. याप्रमाणें हें सर्वगुणसंपन्न असल्यामुळें उदररोगावर व मूळव्याधीवर जे ताकाचे प्रयोग सांगितले आहेत ते सर्व संग्रहणीवरही गुणकारी आहेत—त्यांचा उपयोग करावा.

यमान्यामलके पथ्या मरिचं त्रिपलांशिकम् ।
लवणानि पलांशानि पञ्च चैकत्र चूर्णयेत् ॥ ११७ ॥

तक्रकं सामुलं जातं तक्रारिष्टं पिबेन्नरः ।
दीपनं शोथगुल्मार्शःक्रिमिमेहोदरापहम् ॥ ११८ ॥

तक्रारिष्ट—ओंवा, आंवळे, हिरडे, मिरें हीं प्रत्येकीं बारा तोळे व पंचलवणें प्रत्येकीं ४ तोळे या सर्वांचें चूर्ण एकत्र करून तें ताकांत घालून अरिष्ट बनवून प्यावें. ( साधारणपणें उन्हाळ्यांत तीन दिवस, थंडाच्या दिवसांत सहा दिवस आणि इतर काळीं चार दिवसपर्यंत झांकून ठेविल्यानें अरिष्ट बनतें. ) हें दीपक असून सूज, गुल्म, मूळव्याध, कृमि, प्रमेह व उदर या रोगांचा नाश करतें.

स्वस्थानगतमुत्क्लिष्टमग्निनिर्वापकं भिषक् ।
पित्तं ज्ञात्वा विरेकेण निर्हरेद्वमनेन वा ॥ ११९ ॥
अविदाहिभिरन्नैश्च लघुभिस्तिक्तसंयुतैः ।
जाङ्गलानां रसैर्यूषैर्मुद्गादीनां खडैरपि ॥ १२० ॥
दाडिमाम्लैः ससर्पिष्कैर्दीपनग्राहिसंयुतैः ।
तस्याग्निं दीपयेच्चूर्णैः सर्पिर्भिर्वा सतिक्तकैः ॥ १२१ ॥

अग्नि व पित्त या दोहोंचेंही स्थान ग्रहणी आहे. पित्त द्रव असल्यामुळें तें वाढलें असतां अग्नीस विझवतें. असें तें अग्नीस विझवणारें स्वस्थानापासून च्युत झालेलें व आपल्या स्थानांत असलेलें पित्त त्या त्या दोषानुरूप वमन किंवा विरेचनाच्या द्वारें काढून टाकावें. नंतर त्यास अविदाही, हलकें, तिक्त-औषधमिश्रित अन्न डाळिंबाच्या रसाची आंबटाण, तूप आणि दीपक व ग्राहक पदार्थांनीं सिद्ध केलेले जांगल प्राण्यांचे मांसरस, मूग, कुळीथ वगैऱ्यांचीं कढणें, तिक्त द्रव्यप्रधान चूर्णें किंवा तिक्त घृत हीं खाऊं घालून त्याचा अग्नि प्रदीप्त करावा.

चन्दनं पद्मकोशीरं पाठां मूर्वां कुटन्नटम् ।
षड्ग्रन्था शारिवास्फोतासप्तपर्णाटरूषकान् ॥ १२२ ॥
पटोलोदुम्बराश्वत्थवटप्लक्षकपीतनान् ।
कटुकां रोहिणीं मुस्तं निम्बं च द्विपलांशिकम् ॥ १२३ ॥

द्रोणेऽपां साधयेत्पादशेषे प्रस्थं घृतात्पचेत् ।
किराततिक्तेन्द्रयववीरामागधिकोत्पलैः ॥ १२४ ॥
कल्कैरक्षसमैः पेयं तत्पित्तग्रहणीगदे ।
तिक्तकं यद्घृतं प्रोक्तं कौष्ठिके तच्च दापयेत् ॥ १२५ ॥

चन्दनादिघृत—चंदन, पद्मकाष्ठ, वाळा, पहाडमूळ, मोरवेल, भद्रमोथा, वेखंड, पांढरी व काळी उपळसरी, सातवीण, अडुळसा, कडूपडवळ, उंबर, पिंपळ, वड, पिंपरी, पारोसापिंपळ यांच्या साली, कुटकी, नागरमोथा, व कडूलिंब हीं प्रत्येकीं आठ आठ तोळे घेऊन त्यांचा १६ शेर पाण्यांत काढा करावा. चतुर्थांश उरवून त्यांत कडू किराईत, इंद्रजव, क्षीरकाकोळी, पिंपळी व निळेंकमळ यांचा एकेक तोळा कल्क टाकून एक शेर तूप सिद्ध करावें. हें पित्तग्रहणींत द्यावें. याशिवाय कुष्ठचिकित्सेंत जीं तिक्तघृतें सांगितलीं आहेत तीं हीं द्यावी.

नागरातिविषे मुस्तं धातकीं सरसाञ्जनम् ।
वत्सकत्वक्फलं बिल्वं पाठां कटुकरोहिणीम् ॥ १२६ ॥
पिबेत्समांशं तच्चूर्णं सक्षौद्रं तण्डुलाम्बुना ।
पैत्तिके ग्रहणीदोषे रक्तं यच्चोपवेश्यते ॥ १२७ ॥
अर्शांसि च गुदे शूलं जयेच्चैव प्रवाहिकाम् ।
नागराद्यमिदं चूर्णं कृष्णात्रेयेण पूजितम् ॥ १२८ ॥

नागरादिचूर्ण—सुंठ, अतिविष, नागरमोथा, धायटीचीं फुलें, रसांजन, कुड्याची साल व बिया, बेल, पहाडमूळ व कुटकी या सर्व औषधांचें समभाग चूर्ण, तांदळाचें धुवण व मधांतून प्यावें. हें पित्तग्रहणींत होणारे रक्ताचे जुलाब, मूळव्याध, गुदशूळ, व ( पाण्याचे ) जुलाब यांस बरें करितें. हें नागरादि चूर्ण कृष्णात्रेयांनीं फार पूज्य मानलें आहे.

भूनिम्बं कटुकं व्योषं मुस्तामिन्द्रयवान् समान् ।
द्वौ चित्रकाद्वत्सकत्वग्भागान् षोडश चूर्णयेत् ॥ १२९ ॥

गुडशीताम्बुना पीतं ग्रहणीदोषगुल्मनुत् ।
कामलाज्वरपाण्डुत्वमेहारुच्यतिसारनुत् ॥ १३० ॥

**भूनिम्बादिचूर्ण**--किराइत, कुटकी, त्रिकटु, नागरमोथा व इंद्रजव हीं समभाग, चित्रक दोन भाग आणि कुड्याची साल सोळा भाग घेऊन त्यांचें चूर्ण करून तें गूळ व थंड पाण्याबरोबर घ्यावें. हें संग्रहणी, गुल्म, कावीळ, ताप, पांडु, प्रमेह, अरुचि व अतिसार यांचा नाश करितें.

वचामतिविषां पाठां सप्तपर्णरसाञ्जनम् ।
श्योनाकोदीच्यकट्वङ्गवत्सकत्वग्दुरालभाः ॥ १३१ ॥
दार्वीं पर्पटकं मूर्वां यमानीं मधुशिग्रुकम् ।
पटोलपत्रं सिद्धार्थान्यूथिकं जातिपल्लवान् ॥ १३२ ॥
जम्ब्वाम्रबिल्वमध्यानि निम्बशाकफलानि च ।
तद्रोगशममन्विच्छन् भूनिंबाद्येन योजयेत् ॥ १३३ ॥

वेखंड, अतिविष, पहाडमूळ, सातवीण, रसांजन, टेंटू, वाळा, टेंभुरणी, कुड्याची साल, धमासा, दारुहळद, पित्तपापडा, मोरवेल, ओंवा, तांबड्या शेवग्याच्या बिया, कडूपडवळीचीं पानें, शिरस, जुई, जाईचीं पानें, जांभूळ व आंबा यांची कोय, बेलफळाचा गीर, कडू लिंबाचीं पानें व बिया या सर्व जिनसांनें समभाग चूर्ण पूर्वोक्त भूनिंबादिचूर्णाशीं मिळवून घेतलें असतां त्या चूर्णानें बरे होणारे रोग शमन पावतात.

किराततिक्तं षड्ग्रन्था त्रायमाणा कटुत्रिकम् ।
चन्दनं पद्मकोशीरं दार्वीत्वक्कटुरोहिणी ॥ १३४ ॥
कुटजत्वक्फलं मुस्तं यमानी देवदारु च ।
पटोलनिम्बपत्रैलासौराष्ट्र्यतिविषात्वचः ॥ १३५ ॥
मधुशिग्रोश्च बीजानि मूर्वा पर्पटकाँस्तथा ।
तच्चूर्णं मधुना लेह्यं पेयं मद्यैर्जलेन वा ॥ १३६ ॥

हृत्पाण्डुग्रहणीरोगगुल्मशूलारुचिज्वरान् ।
कामलां सन्निपातश्च मुखरोगाँश्च नाशयेत् ॥ १३७ ॥

**किरातादिचूर्ण**—किराईत, वेखंड, त्रायमाण, त्रिकटु, चंदन, पद्मकाष्ठ, वाळा, दारुहळद, दालचिनी, कुटकी, कुड्याची साल व बिया, नागरमोथा, ओंवा, देवदार, कडू पडवळ व कडू लिंबाचीं पानें, वेलची, तुरटी, अतिविष, दालचिनी, तांबड्या शेवग्याच्या बिया, मोरवेल व पित्तपापडा या सर्व समभाग औषधांचें चूर्ण करून तें मधांतून चाटावें किंवा मद्यांतून अथवा पाण्यांतून प्यावें. हें हृद्रोग, पांडु, संग्रहणी, गुल्म, शूळ, अरुचि, ताप, कावीळ, सन्निपात व मुखरोग यांचा नाश करितें.

ग्रहण्यां श्लेष्मदुष्टायां वमितस्य यथाविधि ।
कट्वम्ललवणक्षारैस्तिक्तैश्चाग्निं विवर्धयेत् ॥ १३८ ॥
पलाशं चित्रकं चव्यं मातुलुङ्गं हरीतकीम् ।
पिप्पलीं पिप्पलीमूलं पाठां नागरधान्यकम् ॥ १३९ ॥
कार्षिकाण्युदकप्रस्थे पक्त्वा पादावशेषितम् ।
पानीयार्थं प्रयुञ्जीत यवागूं तैश्च साधिताम् ॥ १४० ॥
शुष्कमूलकयूषेण कौलत्थेनाथवा पुनः ।
कट्वम्लक्षारपटुना लघून्यन्नानि भोजयेत् ॥ १४१ ॥
अम्लं चानुपिबेत्तक्रं तक्रारिष्टमथापि वा ।
मदिरां मध्वरिष्टान्वा निगदं शीधुमेव वा ॥ १४२ ॥

कफदूषित ग्रहणींत रोग्यास यथाविधि वमन करवून तिखट, आंबट क्षार व कडू औषधांनीं त्याचा अग्नि प्रदीप्त करवावा. पळस, चित्रक, चवक, महाळुंग, हिरडे, पिंपळी, पिंपळीमूळ, सुंठ व धणे हीं औषधें प्रत्येकीं एकेक तोळा घेऊन एक शेर पाण्यांत शिजवावीं. चतुर्थांश काढा उरवून गाळून घ्यावा व तो पाण्याऐवजीं प्यावा. तसेंच हींच औषधें

घालून सिद्ध केलेली कण्हेरी प्यावी. तिखट, आंबट, क्षार व खारट औषधांनीं युक्त्या मुळ्यांचें किंवा कुळतांचें कढण करून त्याबरोबर हलकें अन्न खावें आणि त्यावर आंबट ताक, तक्रारिष्ट, मद्य, मध्वरिष्ट, निगद किंवा शीधुपान करावें.

द्रोणं मधूकपुष्पाणां विडङ्गश्च ततोऽर्धतः।
चित्रकस्य ततोऽर्धं स्यात्तथा भल्लातकाढकम् ॥ १४३ ॥
मञ्जिष्ठात्रिपलश्चैव त्रिद्रोणेऽपां विपाचयेत्।
द्रोणशेषे तु तच्छीतं मध्वर्धाढकसंयुतम् ॥ १४४ ॥
एलामृणालागुरुभिश्चन्दनेन च रूषिते।
कुम्भे मासस्थितं जातमासवं तं प्रयोजयेत् ॥ १४५ ॥
ग्रहणीं दीपयत्येष बृंहणः कफपित्तजित्।
शोथं कुष्ठं किलासञ्च प्रमेहांश्च प्रणाशयेत् ॥ १४६ ॥

मध्वासव—मोहाचीं फुलें सोळा शेर, वावडिंगें ८ शेर, चित्रक ४ शेर, बिबे ४ शेर व मञ्जिष्ठ १२ तोळे, हीं सर्व औषधें ९६ शेर पाण्यांत शिजवून चतुर्थांश काढा उरला ह्मणजे गाळून घेऊन तो निवल्यावर त्यांत ४ शेर मध घालावा. आणि वेलची, कमळांचे देंठ, अगर व चंदन हीं सुवासिक द्रव्यें वाटून मडक्याच्या आंतल्या आंगानें लिपून त्यांत सदरहू मिश्रण भरून ठेवावें. असें एक महिनाभर ठेवल्यानें आसव तयार होतें. हें ग्रहणीस प्रदीप्त करितें, पुष्टि देतें, कफ-पित्तास जिंकितें आणि सूज, कुष्ठ, किलास व प्रमेह यांचा नाश करितें.

मधूकपुष्पस्वरसं शृतमर्द्धक्षयीकृतम्।
क्षौद्रपादयुतं शीतं पूर्ववत्सन्निधापयेत् ॥ १४७ ॥
तं पिबन् ग्रहणीदोषाञ्जयेत्सर्वान् हिताशनः।
तद्वद्द्राक्षेक्षुखर्जूरस्वरसानःसुतान् पिबेत् ॥ १४८ ॥

दुसरें मध्वासव—मोहाच्या फुलांचा स्वरस शिजवून अर्धा आटवून त्यांत निवल्यावर चतुर्थांश मध घालून पूर्वींच्या आसवाप्रमाणेंच

मडक्यांत भरून आसव तयार करावें. हें आसव पिऊन हिताहार केला असतां सर्व प्रकारचे ग्रहणीरोग बरे होतात. याच रीतीनें द्राक्षें, ऊंस, खजूर यांच्या स्वरसांचीं आसवें तयार करून घ्यावीं.

प्रस्थौ दुरालभाया द्वौ प्रस्थमामलकस्य च ।
यष्टी चित्रकदन्त्योर्द्वौ प्रत्यग्रं चाभयाशतम् ॥ १४९ ॥
चतुर्द्रोणेऽम्भसः पक्त्वा शीतं द्रोणावशेषितम् ।
सगुडद्विशतं पूतं मधुनः कुडवायुतम् ॥ १५० ॥
तद्वत्प्रियङ्गोः पिप्पल्या विडङ्गानाश्च चूर्णितैः ।
कुडवैर्घृतकुम्भस्थं पक्षजातं ततः पिबेत् ॥ १५१ ॥
ग्रहणीपाण्डुरोगार्शः कुष्ठवीसर्पमेहनुत् ।
स्वरवर्णकरश्चैव रक्तपित्तकफापहः ॥ १५२ ॥

दुरालभासव—धमासा दोन शेर, आंवळे, ज्येष्ठमध, चित्रक, व दन्तीमूळ एक एक शेर, आणि ताजे हिरडे शंभर हीं सर्व औषधें १२८ शेर पाण्यांत शिजवून चतुर्थांश काढा उरला ह्मणजे त्यांत ८०० तोळे गूळ घालावा आणि उतरून गाळून घ्यावा. निवल्यावर त्यांत ३२ तोळे मध व गहुला, पिंपळी, व वावंडिंगें यांचें प्रत्यकीं १६ तोळे चूर्ण घालून तुपानें राबलेल्या मडक्यांत भरून ठेवावें. पंधरा दिवसांनीं आसव तयार झालें ह्मणजे प्यावें हें ग्रहणी, पाण्डुरोग, मूळव्याध, कुष्ठ, विसर्प, प्रमेह, यांचें नाशक, स्वर सुधारणारें, कांतिवर्धक आणि रक्त-पित्त व कफनाशक आहे.

हरिद्रा पञ्चमूले द्वे वीरकर्षभजीवकम् ।
एषां पञ्च पलान् भागांश्चतुर्द्रोणेऽम्भसः पचेत् ॥ १५३ ॥
द्रोणशेषे रसे पूते गुडस्य द्विशतं भिषक् ।
चूर्णितान्कुडवार्द्धांशान्प्रक्षिपेच्च समाक्षिकान् ॥ १५४ ॥
प्रियङ्गुमुस्तमाञ्जिष्ठाविडङ्गमधुकप्लवान् ।
लोध्रं शाबरकञ्चैव मासार्धं स्थापयेत्ततः ॥ १५५ ॥
एष मूलासवः सिद्धो दीपनो रक्तपित्तजित् ।
आनाहकफहृद्रोगपाण्डुरोगाङ्गसादनुत् ॥ १५६ ॥

मूलासव—हळद, दारुहळद, दशमुळें, क्षीरकाकोळी, ऋषभक व जीवक हीं औषधें प्रत्येकीं २०।२० तोळे घेऊन १२८ शेर पाण्यांत शिजवावीं. चतुर्थांश काढा उरला ह्मणजे गाळून घेऊन त्यांत ८०० तोळे गूळ बारीक करून घालावा. तसेंच १६ तोळे मध आणि गहुला, नागरमोथा, मंजिष्ठ, वावडिंग, ज्येष्ठमध, जलमोथा, लोध्र व पठाणीलोध या प्रत्येकांचें ८।८ तोळे चूर्ण घालून पंधरा दिवसपर्यंत तुपानें रावलेल्या मडक्यांत भरून ठेवावें. हें मूलासव अग्निदीपक, रक्तपित्तनाशक, पोटफुगी, कफ, हृद्रोग, पांडुरोग, व हात पाय गळणें या विकारांस नाहींसें करणारें आहे.

मास्थिकं पिप्पलीं पिष्ट्वा गुडं मध्यं बिभीतकात् ।
उदकप्रस्थसंयुक्तं यवपल्ले निधापयेत् ॥ १५७ ॥
तस्मात्पलं सुजातात्तु सलिलाञ्जलिसंयुतम् ।
पिबेत्पिण्डासवो ह्येष रोगानीक विनाशनः ॥ १५८ ॥
स्वस्थोऽप्येनं पिबेन्मासं नरः सिद्धं रसायनम् ।
इच्छँस्तेषामनुत्पत्तिं रोगाणां ये प्रकीर्तिताः ॥ १५९ ॥

पिण्डासव—१ शेर पिंपळी, १ शेर गूळ व १ शेर बेहेड्याच्या बिया ( जल्पकल्पतरुकार गंगाधर शास्त्र्यांच्या मतें मध्यम आकृतीचे बेहेडे ) या वाटून दोन शेर पाण्यांत कालवून तें पाणी मडक्यांत भरून मडकें जवाच्या भुसांत पुरून ठेवावें. महिन्यानें चांगलें आसव तयार झालें ह्मणजे त्यांतून आठ तोळे आसव घेऊन ३२ तोळे पाणी मिळवून प्यावें. हें पिण्डासव एकंदर रोगसमूहाचा नाश करितें. हें सिद्ध रसायन आहे. निरोगी मनुष्यानेंही एक महिनाभर हें घेतलें असतां त्यास पूर्वोक्ति रोग होणार नाहींत.

नवे पिप्पलिमध्वाक्ते कलशेऽगुरुधूपिते ।
मध्वाढकं जलसमं चूर्णानीमानि दापयेत् ॥ १६० ॥

कुडवार्धं विडङ्गानां पिप्पल्याःकुडवं तथा ।
चतुर्थकांशान् त्वक्क्षीर्याः केशरं मरिचानिच ॥ १६१ ॥
त्वगेलापत्रकशटीक्रमुकातिविषाघनम् ।
हरेण्वेलुकतेजोव्हाविप्पलीमूलचित्रकान् ॥१६२॥
कार्षिकाँस्तान्स्थितं मासमत ऊर्ध्वं प्रयोजयेत् !
मन्दं सन्दीपयत्यग्निं करोति विषमं समम् ॥ १६३ ॥
हृत्पाण्डुग्रहणीरोगकुष्ठार्शःश्वयथुज्वरान् ।
वातश्लेष्मामयाँश्चान्यान्मध्वरिष्टो व्यपोहित ॥ १६४ ॥

मध्वरिष्ट—एक कोरें मडकें घेऊन त्याच्या आंतून पिंपळीचा कल्क व मध यांचा लेप करावा व अगराची धुरी द्यावी. नंतर त्या मडक्यांत ८ शेर मध, ८ शेर पाणी, ८ तोळे वावडिंगें, १६ तोळे पिंपळी, आणि वंशलोचन, नागकेशर, मिरें, दालचिनी, वेलची, तमालपत्र. कचोरा, सुपारी, अतिविष, नागरमोथा, रेणुकबीज, एलवालुक, चवक, पिंपळीमूळ, व चित्रक हीं प्रत्येकीं एक एक तोळा या प्रमाणें सर्वांचें चूर्ण घालून तें मिश्रण एक महिनाभर पुरून ठेवावें. नंतर सेवन करावें. हें मध्वरिष्ट मन्दाग्नीस प्रदीप्त करितें, विषमाग्नीस सम करितें, आणि हृद्रोग, पांडुरोग, संग्रणी, कुष्ठ, मूळव्याध, सूज, ताप, व इतर वात कफ रोग यांस नाहींसें करितें.

समूलां पिप्पलीं क्षारौ द्वौ पञ्च लवणानिच ।
मातुलुङ्गाभया रास्ना शटी मरिचनागरम् ॥ १६५ ॥
कृत्वा समांशं तच्चूर्णं पिबेत्प्रातःसुखाम्बुना ।
श्लैष्मिके ग्रहणीदोषे बलवर्णाग्निवर्धनम् ॥ १६६ ॥
एतैरेवौषधैः सिद्धं सर्पिः पेयं समाहृते ।
गौल्मिके षट्पलंप्रोक्तं भल्लातकघृतञ्च यत् ॥ १६७ ॥

पिंपळी, पिंपळीमूळ, जवखार, सज्जीखार, पंचलवणें, महाळुंगाची साल, हिरडे, रास्ना, कचोरा, मिरें व सुंठ हीं सर्व औषधें समभाग घेऊन त्यांचें चूर्ण करावें व कफज संग्रहणींत सकाळीं कोमट पाण्या-बरोबर घ्यावें. हें शक्ति व अग्नि वाढविणारें आहे. वात-कफज संग्र-हणींत याच औषधांनीं सिद्ध केलेलें घृत घ्यावें. अथवा गुल्मावर जें षट्पल घृत सांगितलें आहे त्याचा उपयोग करावा.

बिडं कालोत्थलवणं सर्जिका यावशूकजम् ।
सप्तला कण्टकारी च चित्रकश्चेति दाहयेत् ॥ १६८ ॥
सप्तकृत्वः स्रुतस्यास्य क्षारस्य द्व्याढकेन तु ।
आढकं सर्पिषः पक्त्वा पिबेदग्निविवर्धनम् ॥ १६९ ॥

क्षारघृतम्—बिडलोण, काचलवण, सज्जीखार, जवखार, आणि निवडुंग, रिंगणी व चित्रक यांची राख हीं सर्व समभाग घेऊन पाण्यांत कालवून तें पाणी, गाळावें. याप्रमाणें सात वेळ गाळलेल्या १६ शेर पाण्यांत ८ शेर तूप सिद्ध करून तें घ्यावें. हें अग्निवर्धक आहे.

समूलां पिप्पलीं पाठां चव्येन्द्रयवनागरम् ।
चित्रकातिविषे हिङ्गु श्वदंष्ट्रां कटुरोहिणीम् ॥ १७० ॥
वचां च कार्षिकं पञ्च लवणानां पलानिच ।
दध्नः प्रस्थद्वये तैलसर्पिषोः कुडवद्वये ॥ १७१ ॥
चूर्णीकृतानि निष्क्वाथ्य शनैरन्तर्गतेरसे ।
अन्तर्धूमं ततो दग्ध्वा चूर्णं कृत्वा घृताप्लुतम् ॥ १७२ ॥
पिबेत्पाणितलं तस्मिञ्जीर्णे स्यान्मधुराशनः ।
वातश्लेष्मामयान्सर्वान्हन्याद्विषगरांश्च सः ॥ १७३ ॥

पिपळी, पिपळीमूळ, चवक, इन्द्रजव, सुंठ, चित्रक, अतिविष' हिंग, गोखरू, कुटकी व वेखंड हीं द्रव्यें प्रत्येकीं एक एक तोळा, व पंचलवणें मिळून २० तोळे यांचे चूर्ण करून तें चार शेर दहीं व तेल

आणि तूप ३२।३२ तोळे यांत शिजवावें. हें मिश्रण साधारण आटून कोरडें झालें ह्मणजे एका शरावांत भरून तोंडावर झांकण बसवून कापडमात करून अग्नींत ठेवावें. त्याचा धूर आंतल्याआंत राहून तें चांगलें भाजलें ह्मणजे त्याचें चूर्ण करून दरवेळीं एक तोळा प्रमाणें तुपांतून घ्यावें. हें जिरलें ह्मणजे मधुर अन्न भक्षण करावें. हें सर्व वातकफरोग आणि विषविकार व गरदोष यांस नाहींसें करितें.

भल्लातकं त्रिकटुकं त्रिफलां लवणत्रिकम् ।
अन्तर्धूमं द्विपलिकं गोपुरीषाग्निना दहेत् ॥ १७४ ॥
स क्षारः सर्पिषा पीतो भोज्यो वाऽप्यवचूर्णितः ।
हृत्पाण्डुग्रहणीदोषगुल्मोदावर्तशूलनुत् ॥ १७५ ॥

बिबे, त्रिकटु, त्रिफळा, सैंधव, संचळ व बिडलोण, हीं प्रत्येकीं ८।८ तोळे घेऊन गायीच्या शेणाच्या गोंवऱ्याच्या अग्नींत वर सांगितल्याप्रमाणें अन्तर्धूम पद्धतीनें जाळून त्यांचा क्षार तुपाबरोबर, किंवा इतर भक्ष्य पदार्थांबरोबर खावा. हा हृद्रोग, पांडु, संग्रहणी, गुल्म, उदावर्त व पोटशूळ यांचा नाश करितो.

दुरालभा करञ्जौ द्वौ सप्तपर्णं सवत्सकम् ।
षड्ग्रन्थां मदनं मूर्वां पाठामारग्वधं तथा ॥ १७६ ॥
गोमूत्रेण समांशानि कृत्वा चूर्णानि दाहयेत् ।
दग्ध्वा च तं पिबेत्क्षारं ग्रहणीबलवर्धनम् ॥ १७७ ॥

धमासा, करंज, घाणेरा करंज, सातविणीची साल, कुड्याची साल, वेखंड, गेळफळ, मोरवेल, पहाडमूळ व बाहव्याचा मगज या समभाग औषधांचें चूर्ण करून त्यांत गोमूत्र घालून पूर्वोक्त अन्तर्धूम विधीनें दहन करावें. यापासून जो क्षार बनतो तो घेतल्यानें ग्रहणीची शक्ति वाढवितो.

भूनिम्बं रोहिणीं तिक्तां पटोलं निम्बपर्पटम् ।
दहेन्माहिषमूत्रेण क्षार एषोऽग्निवर्धनः ॥ १७८ ॥

किराईत, कुटकी, कडू पडवळ, कडू लिंब व पित्तपापडा या औषधांचें हत्तीच्या मूत्रांत दहन करून तयार होणारा क्षार घेतल्यानें अग्नि प्रदीप्त होतो.

हे हरिद्रे वचा कुष्ठं चित्रकः कटुरोहिणी ।
मुस्तश्च बस्तमूत्रेण सिद्धः क्षारोऽग्निवर्धनः ॥ १७९ ॥

हळद, दारुहळद, वेखंड, कोष्ठ, चित्रक, कुटकी, व नागरमोथा या औषधांचें बोकडाच्या मुतांत दहन करून क्षार काढावा व तो सेवन करावा. हा अग्नीस वाढविणारा आहे.

चतुष्पलं सुधाकाण्डात् त्रिपलं लवणत्रयात् ।
वार्ताकीकुडवं चार्कादष्टौ द्वे चित्रकात्पले ॥ १८० ॥
दग्धानि वार्ताकुरसे गुलिका भोजनोत्तराः ।
भुक्तं भुक्तं पचत्याशु कासश्वासार्शसां हिताः ।
विसूचिकाप्रतिश्यायहृद्रोगशमनाश्च ताः ॥ १८१ ॥

क्षारगुटिका-निवडुंगाचे दांडे १६ तोळे, सैंधव, संचळ व बिडलोण प्रत्येकीं ४।४ तोळे, पिकून सुकलेलीं डोरली वांगीं १६ तोळे, रुईचीं मुळें ३२ तोळे व चित्रकमुळें ८ तोळे हीं सर्व दहन करून यांच्या क्षाराच्या, डोरली वांग्याच्या रसांत गोळ्या करून जेवल्यावर घ्याव्या. या लवकर अन्नपचन करितात, खोकला, दमा व मूळव्याध यांवर हितकर आहेत. आणि विसूचिका, पडसें व हृद्रोग यांचें ही शमन करितात.

वत्सकातिविषे पाठां दुःस्पर्शं हिङ्गु चित्रकम् ।
चूर्णीकृत्य पलाशानां क्षारे मूत्रस्रुते पचेत् ॥ १८२ ॥
आयसे भाजने सान्द्रात्तस्मात्कोलं सुखाम्बुना ।
मद्यैर्वा ग्रहणीदोषे शोथार्शःपाण्डुमान्पिबेत् ॥ १८३ ॥

कुड्याची साल, अतिविष, पहाडमूळ, धमासा, हिंग व चित्रक. या औषधांचें चूर्ण करावें व तें पळसाचा क्षार काढून गाळलेल्या गोमूत्रांत

मिळवून लोखंडाच्या भांड्यांत शिजवावें. दाट झालें ह्मणजे उतरून ठेवावें. यांतून दरवेळीं ८ मासे प्रमाण कोमट पाण्यांतून किंवा मद्याबरोबर घेतलें असतां संग्रहणी, सूज, मूळव्याध व पांडुरोग बरे होतात.

त्रिफलां कटभीं चव्यं बिल्वमध्यमयोरजः ।
रोहिणीं कटुकां मुस्तं कुष्ठं पाठाञ्च हिङ्गु च ॥ १८३ ॥

मधुकं मुष्ककयवक्षारौ त्रिकटुकं वचाम ।
विडङ्गं पिप्पलीमूलं स्वर्जिकां निम्बचित्रकौ ॥ १८४ ॥

मूर्वाजमोदेन्द्रयवान् गुडूचीं देवदारु च ।
कार्षिकं लवणानाञ्च पञ्चानां पलिकान्पृथक् ॥ १८५ ॥

भागान्दधि त्रिकुडवे घृततैलेन मूर्च्छितान् ।
अन्तर्धूमं शनैर्दग्ध्वा तस्मात्पाणितलं पिबेत ॥ १८६ ॥

सर्पिषा कफवातार्शोग्रहणी पाण्डुरोगवान् ।
प्लीहमूत्रग्रहश्वासहिक्काकासकृमिज्वरान् ।
शोषातिसारौ श्वयथुं प्रमेहानाहहृद्ग्रहान् ॥ १८७ ॥

हन्यात्सर्वविषश्चैव क्षारोऽग्निजननो वरः ।
जीर्णे रसैर्वा मधुरैरन्नं स्यात्पयसापिवा ॥ १८८ ॥

त्रिफळा, मालकांगोणी, चवक, बेलफळाचा मगज, लोहचूर्ण, कुटकी, नागरमोथा, कोष्ठ, पहाडमूळ, हिंग, ज्येष्ठमध, घंटापाटली, जवखार, त्रिकटु, वेखंड, वावडिंग, पिंपळीमूळ, सज्जीखार, कडूलिंब, चित्रक, मोरवेल, अजमोदा, इंद्रजव, गुळवेल, देवदार, हीं औषधें प्रत्येकीं एक एक तोळा आणि पांच लवणें प्रत्येकीं ४।४ तोळे घेऊन सर्वांचें चूर्ण करावें आणि त्यांत ९६ तोळे दहीं व या शिवाय तेल तूप मिळवून तें सर्व मिश्रण मडक्यांत भरून पूर्वी सांगितलेल्या अन्तर्धूम विधीनें मन्दाग्नींत दग्ध करून त्याचा क्षार करावा. यापैकीं दरवेळेस एक तोळा क्षार तुपांतून घेतला असतां तो कफवातज मूळव्याध, संग्रहणी, पांडुरोग, प्लीहवृद्धि, लघ्वी कोंडणें, दमा, उचकी, खोकला, कृमि, ताप, क्षय अतिसार, सूज, प्रमेह, पोटफुगी, छाती धरणें व सर्व प्रकारचे विषविकार

याचा नाश करून उत्कृष्ट प्रतीचें अग्निदीपन करितो. हा क्षार पचल्यावर मधुर मांसरसाबरोबर किंवा दुधाबरोबर भात जेवावा.

त्रिदोषे विधिवद्वैद्यः पञ्चकर्माणि कारयेत् ।
घृतक्षारासवारिष्टान्दद्याच्चाग्निविवर्धनान् ॥ १८९ ॥
क्रिया या चानिलादीनां निर्दिष्टा ग्रहणींप्रति ।
व्यत्यासात्तां समस्तांश्च कुर्याद्दोषविशेषवित् ॥ १९० ॥

त्रिदोषज संग्रहणींत वैद्यानें वमनादि पञ्चकर्में करवावीं. अग्निवर्धक घृतें, क्षार, आसवें, अरिष्टें, वगैरे द्यावीं. तसेंच मागें वातादिजन्य संग्रहणीची जी निरनिराळी चिकित्सा सांगितली आहे ती सर्व, दोष-विशेषानुसार जरूर वाटल्यास त्यांत कांहीं फेरफार करून, योजावी.

स्नेहनं स्वेदनं शुद्धिर्लङ्घनं दीपनञ्चयत ।
चूर्णानि लवणक्षारमध्वरिष्ट सुरासवाः ॥ १९१ ॥
विविधास्तक्रयोगाश्च दीपनानाञ्च सर्पिषाम ।
ग्रहणीरोगिभिःसेव्याः क्रियांचावस्थिकींशृणु ॥ १९२ ॥

संग्रहणीच्या रोग्यानें स्नेहन, स्वेदन, शोधन, लंघन, दीपन, चूर्णें, लवणें, क्षार, मध्वरिष्टें, सुरा, आसवें, अनेक प्रकारचे तक्रप्रयोग व दीपक घृतप्रयोग यांचें सेवन करावें. आतां कोणत्या अवस्थेंत कोणती चिकित्सा करावी हें ऐक.

ष्ठीवने श्लैष्मिके रूक्षं दीपनं तिक्तसंयुतम ।
सकृद्रूक्षं सकृत्स्निग्धं कृशे बहुकफे हितम ॥ १९३ ॥
परिक्षामशरीरस्य दीपनं स्नेहसंयुतम ।
दीपनं बहुपित्तस्य तिक्तं मधुरसंयुतम ॥ १९४ ॥
बहुवातस्य तु स्नेहलवणाम्लयुतं हितम ।
सन्धुक्षति यदा वन्हिः परेषां विधिनेन्धनैः ॥ १९५ ॥
स्नेहमेव परं विद्याद्दुर्बलानलदीपनम ।
नालं स्नेहसमिद्धस्य शमायान्नं सुगुर्वपि ॥ १९६ ॥
मन्दाग्निरपि पक्वन्तु पुरीषं योऽतिसार्यते ।
दीपनीयौषधैर्युक्तां घृतमात्रां पिबेत्तु सः ॥ १९७ ॥
तया समानः पवनः प्रसन्नो मार्गमाश्रितः ।

अग्नेः समीपचारित्वादाशु प्रकुरुते बलम् ॥ १९८ ॥
काठिनाद्यः पुरीषन्तु कृच्छ्रान्मुञ्चति मानवः।
सघृतं लवणैर्युक्तं नरोऽन्नावग्रहं पिबेत् ॥ १९९ ॥
रौक्ष्यान्मन्दे पिबेत्सर्पिस्तैलं वा दीपनैर्युतम् ।
अतिस्नेहात्तु मन्देऽग्नौ चूर्णारिष्टासवाहिताः ॥ २०० ॥

कफजन्य प्रसेकांत तिक्त व रूक्ष असें अग्निदीपक औषध द्यावें. रोगी कृश असून त्यास कफाचा जोर असल्यास एकदां रूक्ष व एकदां स्निग्ध असें पालटून पालटून द्यावें. कृश झालेल्या मनुष्यास दीपक औषध द्यावयाचें तें स्नेहसंयोगानें द्यावें. पित्ताचा जोर असलेल्या रोग्यास दीपक औषध द्यावयाचें तें तिक्त व मधुर अशा औषधांनीं मिश्रित असावें. वाताचा जोर असलेल्या रोग्यास स्निग्ध, लवण व आंबट अशा औषधांनीं संयुक्त दीपन-द्यावें. विधिपूर्वक सरपण घातल्यानें ज्याप्रमाणें बाह्य अग्नि प्रदीप्त होतो, त्यचप्रमाणें विधिपूर्वक दीपक औषध घेतल्यानें जठराग्नि प्रदीप्त होतो. अशक्त जठराग्नीचें दीपन करण्यास स्नेहच उत्कृष्ट होय. स्नेहानें प्रदीप्त झालेल्या अग्नीचें शमन करण्यास चांगलें जड अन्नही समर्थ होत नाहीं. रोग्याचा अग्नि मंद झाल्यानें व कफाचा क्षय झाल्या कारणानें जर त्याचा मल पक्क होऊन ही त्यास पातळ परसाकडे होत असेल तर दीपक औषधमिश्रित घृत थोडथोडें पाजावें. या योगानें अग्निदीपक जो समान वायु तो मोकळा होऊन आपल्या मार्गावर येऊन अग्नीच्या निकटवर्ती असल्यामुळें त्यास प्रदीप्त करितो. मळाचा खडा धरल्यामुळें ज्यास कष्टानें शौचास होतें, त्यानें पंचलवण-मिश्रित तूप पिऊन वर जेवावें. रूक्षतेमुळें अग्नि मंद पडला असल्यास दीपक औषधमिश्रित तूप अथवा तेल प्यावें. आणि तोच अग्नि जर अति स्निग्धतेच्या योगानें मंद झाला असेल तर पूर्वोक्त चूर्णें, अरिष्टें, आसवें वगैरे घ्यावीं.

भिन्ने गुदेऽपलेहस्तु बिडतैलसुरासवाः ।
उदावर्त्तात्तु मन्देऽग्नौ निरूहाः स्नेहबस्तयः ॥ २०१ ॥

दोषवृध्या तु मन्देऽग्नौ शुद्धो दोषविधिं चरेत् ।
व्याधिमुक्तस्य मन्दे तु सर्पिरेवाग्निदीपनम् ॥ २०२ ॥
उपवासाच्च मन्देऽग्नौ यवागूभिः पिबेद्धृतम् ।
अन्नावपीडितं चालं दीपनं बृंहणञ्च तत् ॥ २०३ ॥
दीर्घकालप्रसङ्गात्तु क्षामक्षीणकृशान्नरान् ।
प्रसहानां रसैः साम्लैर्भोजयेत्पिशिताशिनाम् ॥ २०४ ॥
लघुतीक्ष्णोष्णशोधित्वाद्दीपयन्त्याशुतेऽनलम् ।
मांसोपचितमांसत्वात्तथाशुतरबृंहणाः ॥ २०५ ॥
नाभोजनेन कायाग्निर्दीप्यते नातिभोजनात् ।
यथा निरिन्धनो वन्हिरल्पो वातीन्धनावृतः ॥ २०६ ॥
स्नेहान्नविधिभिश्चित्रैश्चूर्णारिष्टसुरासवैः ।
प्रयुक्तैर्भिषजा सम्यग्बलमग्नेः प्रवर्धते ॥ २०७ ॥
यथा हि सारदार्वग्निः स्थिरः सन्तिष्ठते चिरम् ।
स्नेहान्नविधिभिस्तद्वदन्तराग्निर्भवेत्स्थिरः ॥ २०८ ॥
हितं जाणं मितं चाश्नंश्चिरमारोग्यमश्नुते ।
अवैषम्येण धातूनामग्निवृद्धौ यतेत वा ॥ २०९ ॥
समैर्दोषैः समो मध्ये देहस्योष्माग्निसंस्थितः ।
पचत्यन्नं तदारोग्यपुष्ट्यायुर्बलवृद्धये ॥ २१० ॥
दोषैर्मन्दोऽतिवृद्धो वा विषमैर्जनयेद्गदान् ।
पाच्यं मन्दस्य तत्रोक्तमतिवृद्धस्य वक्ष्यते ॥ २११ ॥

फार जुलाब होऊन मलद्वार पिकून बाहेर आलें असल्यास अवलेह, बिड, तेल, सुरा, आसव हीं द्यावीं. उदावर्तानें अग्नि मंद झाला असल्यास निरूह व स्नेहबस्ति द्यावे. वातादि दोष वाढल्यामुळें अग्नि मंद झाला असल्यास शोधन करवून पेयादि क्रम करावा. रोगांतून उठल्यामुळें अग्नि मंद पडला असल्यास (दीपकऔषधयुक्त) तूप हेंच अग्निदीपक होय. उपासांनीं अग्नि मंद झाला असल्यास अर्ध्या जेवणावर तूप घातलेली कण्हेरी प्यावी. ही अग्निदीपक व पौष्टिक आहे. पुष्कळ दिवसांच्या आजारीपणांत अग्नि मंद राहून अशक्त व कृश झालेल्या रोग्यास मांसभक्षक प्रसह प्राण्यांच्या मांसाचें आंबटाण घातलेले शोरुवे द्यावे. कारण ते हलके, तीक्ष्ण, उष्ण व शोधक असल्यामुळें अग्नीस सत्वर प्रदीप्त करितात. आणि प्रसह प्राण्यांचें मांस मांसानें वाढलें

असल्यामुळें त्याचे शोरुवे फार लवकर पुष्टि देतात. उपासानें तसेंच अति भोजनानें जठराग्नि नाश पावतो. ज्याप्रमाणें बाह्य अग्नि, सरपण न घातलें तर विझतो, किंवा थोड्या अग्नींत पुष्कळ सरपण घातलें असतां तो विझतो, त्याचप्रमाणें जठराग्निविषयींही समजावें. अनेक प्रकारचे स्नेह, अन्नपान, चूर्णें, अरिष्टें, मद्यें, आसवें यांची वैद्यानें यथायोग्य योजना केली असता अग्नीचें बळ वाढतें. ज्याप्रमाणें खैर वगैरे सारवान् लाकडाचा अग्नि पुष्कळ वेळपर्यंत जसाच्या तसा टिकतो त्याचप्रमाणें स्निग्ध अन्नपानाच्या योगानें जठराग्नि कायम राहतो. हितकर, पूर्वीचें अन्न पचल्यानंतर, व नेमस्त असा जो आहार करतो तो दीर्घकालपर्यंत आरोग्य भोगतो. जठराग्नि वाढविण्याकरितां जे उपाय करावयाचे त्यांपासून धातुवैषम्य उत्पन्न होणार नाहीं ही खबरदारी घेतली पाहिजे. वातादिदोष समस्थितींत असले ह्मणजे जठराग्नि सम राहतो व तो सम अग्नि उत्तम रीतीनें अन्नाचें पचन करून आरोग्य, पुष्टि, आयुष्य व शक्ति यांची वृद्धि करितो. विषम दोषांच्या योगानें अग्नि मंदावला किंवा फार वाढला असतां अनेक प्रकारचे रोग उत्पन्न करितो. मन्दाग्नीची चिकित्सा येथपर्यंत सांगितली. आतां पुढें वाढलेल्या अग्नीची चिकित्सा सांगतों.

### भस्मकचिकित्सामाह.

नरे क्षीणकफे पित्तं कुपितं मारुतानुगम् ।
स्वोष्मणा पावकस्थाने बलमग्नेः प्रयच्छति ॥ २१२ ॥
तथा लब्धबलो देहे विरूक्षे सानिलोनलः ।
परिभूय पचत्यन्नं तैक्ष्ण्यादाशुर्मुहुर्मुहुः ॥ २१३ ॥
पक्त्वान्नं सततं धातूञ्छोणितादीन्पचत्यपि ।
ततो दौर्बल्यमातङ्कान्मृत्युं चोपनयेन्नरम् ॥ २१४ ॥
भुक्तेऽन्ने लभते शान्तिं जीर्णमात्रे प्रताम्यति ।
तृट्श्वासदाहमूर्च्छाद्या व्याधयोऽत्यग्निसम्भवाः ॥ २१५ ॥

तमत्यग्निं गुरुस्निग्धशीतैर्मधुरविज्जलैः
अन्नपानैर्नयेच्छान्ति दीप्तमग्निमिवाम्बुभिः ॥ २१६ ॥
मुहुर्मुहुरजीर्णे ऽपि भोज्यान्यस्योपहारयेत् ।
निरिन्धनोऽन्तरं लब्ध्वा यथैनं न विपादयेत् ॥ २१७ ॥
पायसं कृशरां स्निग्धं पैष्टिकं गुडवैकृतम्
अद्यात्तथौदकानूपपिशितानि घृतानिच ॥ २१८ ॥
मत्स्यान्विशेषतः श्लक्ष्णान्स्थिरतोयचरांस्तथा ।
आविकं सघृतं मांसमद्यादत्यग्निनाशनम् ॥ २१९ ॥
यवागूं समधूच्छिष्टां घृतं वा क्षुधितः पिबेत् ।
गोधूमचूर्णमन्थं वा व्याधयित्वा शिरां पिबेत् ॥ २२० ॥
पयो वा शर्करां सर्पिर्जीवनीयौषधैः शृतम् ।
फलानां तैलयोनीनामुत्कुञ्चाश्च सशर्कराः ॥ २२१ ॥
मार्दवं जनयन्त्यग्नेः स्निग्धान्मांसरसांस्तथा ।
पिबेच्छीताम्बुना सर्पिर्मधूच्छिष्टेन वा युतम् ॥ २२२ ॥

मनुष्याचा कफ क्षीण होऊन आमाशयांत पित्त वाढलें व त्यांत वायु येऊन मिळाला ह्मणजे तें कुपित पित्त आपल्या उष्णतेनें ग्रहणींत अग्निचा जोर वाढवितें. याप्रमाणें बळावलेला अग्नि वातयुक्त होत्साता रूक्ष शरीरांत आपल्या तीक्ष्णतेच्या योगानें फारच लवकर व वरचेवर अन्नाचें पचन करितो. याप्रमाणें तो अग्नि सतत पचन करीत असल्यामुळें अन्न संपलें ह्मणजे मग रक्तादि धातूंचें पचन करूं लागतो. त्यायोगानें अशक्तता व रोग उत्पन्न होऊन मनुष्य मृत्युप्रत पावतो. जेवलें कीं रोग्यास शांति वाटते व अन्न जिरलें कीं पुन्हां कलकलूं लागतें. तहान, दमा, दाह, मूर्च्छा वगैरे अत्याग्नि पासून होणारे रोग उद्भवतात. या अतिशय वाढलेल्या अग्नीस जड, स्निग्ध, थंड, मधुर, रसभरित—बुळबुळीत अन्नपानांच्या योगानें, पाण्यानें जसा पेटलेला विस्तव विझवितात त्याप्रमाणें, शांत करावे. त्यास एकसारखें वरचेवर

पूर्वीचें अन्न जिरलें नसलें तरी, खावयास देत असावें. कारण न जाणो कदाचित् त्या अग्नीस अन्नरूपी सरपण नसल्यामुळें अवकाश मिळून तो रोग्याचा नाश करील. खीर, खिचडी, स्निग्ध, पिठाचे, गुळाचे पदार्थ, उदकांत व पाणथळ जमिनींत राहणाऱ्या प्राण्यांचें मांस व तूप हे पदार्थ खावे. विशेषेंकरून नरम व तलाव वगैरे सांचलेल्या पाण्यांतील मासे खावे. मेंढ्याचें मांस तुपांत शिजवून खावें. यापासून वाढलेला अग्नि शांत होतो. भूक लागली असतां मेण घालून कण्हेरी प्यावी. किंवा तूप प्यावें. किंवा क्षीर तोडून गव्हांच्या पिठाचें मन्थ प्यावें. दूध, साखर, किंवा जीवनीय गणांतील औषधांनीं सिद्ध केलेलें तूप प्यावें. तेल निघणाऱ्या फळांचा चोंथा, साखर मिळवून खावा. यापासून अग्नि मंद पडतो. स्निग्ध मांसरस प्यावे. थंड पाण्यांतून किंवा मेण घालून तूप प्यावें.

गोधूमचूर्णं पयसा ससर्पिष्कं पिबेन्नरः ।
आनूपरससिद्धान्वा त्रींस्नेहांस्तैलवर्जितान् ॥२२३ ॥
गोधूमचूर्णमन्थं वा व्यधयित्वा क्षिरां पिबेत् ।
पयसा सम्मिताश्चापि घनां त्रिस्नेहसंयुताम् ॥ २२४ ॥
नारीस्तन्येन संयुक्तां पिबेदौदुम्बरीत्वचम् ।
आभ्यां वा पायसं सिद्धमद्यादत्यग्निशान्तये ॥ २२५ ॥
श्यामात्रिवृद्विपकं वा पयोदद्याद्विरेचनम् ।
असकृत्पित्तशान्त्यर्थं पायसप्रतिभोजनम् ॥ २२६ ॥
प्रसमीक्ष्य भिषक्प्राज्ञस्तस्मैदद्याद्विधानवित् ।
यत्किञ्चिन्मधुरं मेद्यं श्लेष्मलं गुरुभोजनम् ।

---

१ कांहीं पुस्तकांत ' भृतानि ' असा पाठ आढळतो. तो घेतल्यास डुक्कर वगैरे चरबी असणाऱ्या प्राण्यांचें मांस असा अर्थ होतो.

२ क्वचित् ' सुभृतं ' पाठ आहे. त्याचा अर्थ पुष्कळ चरबी वालें मेंढ्याचें मांस खावें असा होतो.

तदस्यग्निहितं सर्वं भुक्त्वा प्रस्वपनं दिवा ॥ २२७ ॥
मेद्यान्यन्नानि योऽत्यग्नावप्रशान्तः समश्नुते ।
न तन्निमित्तं व्यसनं लभते पुष्टिमेवच ॥ २२८ ॥
कफे वृद्धे जिते पित्ते मारुते चानलः समः।
समधातोः पचत्यन्नं पुष्ट्यायुर्बलवृद्धये ॥ २२९ ॥

गव्हांचें पीठ तुपासह दुधांत कालवून प्यावें. किंवा आनूप प्राण्यांच्या मांसरसांतून तूप, वसा व मज्जा हीं प्यावीं. शीर तोडून गव्हांच्या पिठाचें मंथ प्यावें, गव्हांचें पीठ, तूप, वसा व मज्जा मिळवून दुधांत दाट भिजवून खावें. उंबराची साल बायकोच्या आंगावरच्या दुधांत वाटून प्यावी. अथवा यांची खीर करून प्यावी. ती भस्मक अग्नीस शांत करिते. काळा निशोत्तर घालून कढविलेलें दूध रेच होण्याकरितां द्यावें. आणि पित्तशमन होण्याकरितां वरचेवर दुधाची खीर पाजावी. कुशल वैद्यानें बरोबर विचार करून यथाविधि ही चिकित्सा करावी. मधुर, मेद वाढविणारे, कफ करणारे व जड असे जे जे पदार्थ आहेत ते सर्व भस्मकाग्नीवर हितकर होत. दिवसा जेवणावर निजणें हें हितकर आहे. ज्या मनुष्याचा अग्नि अतिशय वाढलेला असेल त्यानें मेद वाढविणारे पदार्थ खूप खावे. त्यापासून त्यास अपाय न होतां पुष्टि प्राप्त होते. कफ वाढला, वात व पित्त दबले व जठराग्नि सम झाला ह्मणजे धातुसाम्य होऊन अन्न बरोबर पचतें आणि पुष्टि, आयुष्य व शक्ति यांची वृद्धि होते.

पथ्यापथ्यमिहैकत्रभुक्तं समशनं मतम् ।
विषमं बहुवाल्पं वाप्यप्राप्तातीतकालयोः ॥ २३० ॥
भुक्तं पूर्वान्नशेषे तु पुनरध्यशनं मतम् ।
त्रीण्यप्येतानि मृत्युं वा घोरान्व्याधीन्सृजन्ति वा ॥ २३१ ॥
प्रातराशेत्यजीर्णेऽपि सायमाशो न दुष्यति ।

दिवा प्रबुध्यतेऽर्केण हृदयं पुण्डरीकवत् ॥ २३२ ॥
तस्मिन्विबुद्धे स्रोतांसि स्फुटत्वं यान्ति सर्वशः ।
व्यायामाच्च विचाराच्च विक्षिप्तत्वाच्च चेतसः ॥ २३३ ॥
उत्क्लेदमपगच्छन्ति दिवा तेनास्य धातवः ।
अक्लिन्नेष्वन्नमासिक्तमन्यत्तेषु न दुष्यति ॥ २३४ ॥
अविदग्ध इव क्षीरे क्षीरमन्यद्धि मिश्रितम् ।
रात्रौ तु हृदये म्लाने संवृतेष्वयनेषु च ॥ २३५ ॥
यान्ति कोष्ठे च विक्लेदं संवृते देहधातवः ।
क्लिन्नेष्वन्यदपक्केषु तेष्वासिक्तं प्रदुष्यति ।
विदग्धेषु पयस्स्वन्यत्पयस्तप्तेष्विवार्पितम् ॥ २३६ ॥
नैशेष्वाहारजातेषु नाविपक्केषु बुद्धिमान् ।
तस्मादन्यत्समश्नीयात्पालयिष्यन्बलायुषी ॥ २३७ ॥

पथ्य व अपथ्य दोन्ही प्रकारचें अन्न एकत्र खाणें यास समशन ह्मणतात. फार, थोडें अथवा नियमित वेळेच्या पूर्वी किंवा नंतर खाणें यास विषमाशन ह्मणतात. पूर्वी खाल्लेलें अन्न पोटांत शिल्लक असतां पुन्हां त्यावर खाणें-यास अध्यशन ह्मणतात. हीं तिन्ही प्रकारचीं अविहित जेवणें मृत्यु किंवा घोर व्याधि उत्पन्न करितात. सकाळचें जेवण जिरलें नसून ही संध्याकाळीं जेवलें तरी दोष नाहीं. कारण दिवसा सूर्याच्या किरणांनीं मनुष्याचें हृदय कमळाप्रमाणें प्रफुल्लित असतें. हृदय प्रफुल्लित असलें ह्मणजे शरीरांतील स्रोतें अर्थात् सर्वत्र विकसित असतात. शिवाय दिवसा व्यायाम, विचार व चित्तविक्षेप ह्या क्रिया चालू असल्यामुळें धातूंचा उत्क्लेद नाहींसा होतो. अशा स्थितींत पूर्वीचें अन्न अक्लिन्न असल्यामुळें त्यांत नवीन अन्न पडलें तरी तें बिघडत नाहीं. ज्याप्रमाणें न नासलेल्या दुधांत दुसरें दूध मिसळलें तरी तें नासत नाहीं त्याचप्रमाणें हें समजावें. रात्रीच्या वेळीं

हृदय कोंडजलेलें असतें व त्यामुळें सर्व द्वारें बंद असतात. द्वारें बंद झालीं कीं कोष्ठस्थ धातूंस क्लेद प्राप्त होतो. त्यायोगानें अन्न अपक्क व क्लेदयुक्त होतें. आणि त्यांत नवीन अन्न टाकलें म्हणजे तें बिघडतें. ज्या प्रमाणें नासलेल्या दुधांत दुसरें दूध मिळविलें असतां तें नासतें त्याच प्रमाणें हें ही समजावें. बल व आयुष्य हीं कायम राखूं इच्छिणाऱ्या बुद्धिमान् मनुष्यानें या कारणास्तव रात्रीचें जेवण पचलें नसल्यास सकाळीं दुसरें जेवण जेऊं नये.

अन्तरग्निगुणा देहं यथा धारयते च सः ।
यथान्नं पच्यते यांश्च यथाहारः करोत्यपि ॥ २३८ ॥
येऽग्नयो यांश्च पुष्यन्ति यावन्तो ये पचन्ति यान् ।
रसादीनां क्रमोत्पत्तिर्मलानां तेभ्य एव च ॥ २३९ ॥
तृष्णानामाशुकृद्धेतुर्धातुकालो द्रवक्रमः ।
रोगैकदेशकृद्धेतुरन्तरग्निर्यथाधिकः ॥ २४० ॥
सन्दुष्यति यथा दुष्टो यान्रोगाञ्जनयत्यपि ।
ग्रहणी या यथावच्च ग्रहणीदोषलक्षणम् ॥ २४१ ॥
पूर्वरूपं पृथक्चैव व्यञ्जनं सचिकित्सितम् ।
चतुर्विधस्य निर्दिष्टं तथा चावस्थिकी क्रिया ॥ २४२ ॥
जायते च यथात्यग्निर्येच्च तस्य चिकित्सितम् ।
उक्तवानिह तत्सर्वं ग्रहणीदोषके मुनिः ॥ २४३ ॥

जठराग्नीचे गुण, जठराग्नि कशा रीतीनें शरीर धारण करितो, अन्न कसें पचतें, कोणता आहार कोणते गुण उत्पन्न करितो, कोणता अग्नि कोणत्या गुणाचें पोषण करितो, अग्नि किती प्रकारचे, कोणता कोणाचें पचन करितो, रसादिकांची क्रमोत्पत्ति, त्यांपासून मलाची उत्पत्ति, शीघ्र तृष्णा उत्पन्न करणारीं कारणें, धातूंच्या उत्पत्तिचा काळ व क्रम, एकदेशीय रोग होण्याचा हेतु, जठराग्नि कशानें फार

त होतो, दूषित होऊन कोणते रोग उत्पन्न करितो, प्रकृत व दूषित णीचीं लक्षणें, पूर्वरूप, चार निरनिराळ्या प्रकारच्या ग्रहणीची चिकि, त्या त्या दोषस्थित्यनुरूप चिकित्सा, जठराग्नि अतिशय कसा होतो व त्याची चिकित्सा, इतके विषय या ग्रहणीचिकित्सेच्या यांत आत्रेय ऋषींनीं सांगितले आहेत.

## एकोणिसावा अध्याय समाप्त.

---

